## चक्रावून टाकणारा चमत्कार

# नाडीभविष्य

मूल्य रु. १२/-



डावा
(स्त्री)





उजवा
(पुरुष)



योगी रामसूरत कुमार

विंग कमांडर

शशिकांत ओक



अरविंद आश्रम ध्यानकक्ष

Address :
**Senior Accts. Officer**
Air Force Station Tambaram
Madras 600 046

प्रथम आवृत्ती – सप्टेंबर १९९४

मूल्य : १२ रुपये





मुखपृष्ठ : दीपक इंगळे

# नाडी भविष्य

## शशिकांत ओक



*श्री अगस्त्य, शुक, भृगू, काक भृशुंडी, पराशर आणि इतर अज्ञात महर्षिंच्या नाडी ग्रंथ निर्मितीस त्रिवार नमन व त्यांच्या चरणी प्रस्तुत लेख – सुमने अर्पण –*



''असे नेहमीच दिसून येते की,
जी गोष्ट निंदा व अविश्वासातून सुरू होते.
तिचा शेवट प्रशंसा व पूजेत होतो.''



मुद्रक : सकाळ प्रिंटिंग प्रेस, ५९५,
बुधवार पेठ, पुणे ४११००२.

# अंतरंग



याशिवाय



# भूमिका

जून ९४ च्या सुमारास पुण्यात सह्याद्रीच्या कार्यकारी संपादकांना श्री अगस्त्यनाडी भविष्याचे मराठीतील भाषांतर सहज वाचायला दिले असता लेख लिहा. छापायला आवडेल. असे त्यांनी मत दिले. पुढे एका-दोघांना या विषयावर लिखाण केले तर पुस्तके बनणे शक्य आहे का असे कुतुहलाने विचारत होतो. सह्याद्रीमधील १ ऑगस्ट ९४ च्या लेखानंतर वाचकांची अनेक पत्रे आली. लेखामध्ये बऱ्याच गोष्टी अनुत्तरीत राहिल्या असे वाटून लेखन पुढे चालू ठेवावे असे वाटून लिहित गेलो व आज हे पुस्तक आपल्या हातात देताना नाडी भविष्य शास्त्राबाबत उपस्थित प्रश्नांना माझ्या बाजूने उत्तरे शोधण्याचा प्रयत्न केल्याचे समाधान होत आहे.

ज्या वाचकांना नाडी भविष्य पहायला दक्षिणेत जावेसे वाटते. त्यांना सोईचे होईल अशी सर्व माहिती उपलब्ध जोतिषांचे पत्ते, फीज, तामिळ पंचांगातील वार, महिने, संवत्सर, नक्षत्रे यांची नावे, शांती – दीक्षेसाठी जाणाऱ्यांसाठी नवग्रहाच्या मंदिरांचे पत्ते तेथपर्यंत पोचण्यासाठी नकाशा, उतरण्याच्या मद्रासमधील सोई व बस, ट्रेन यांच्याबाबत उपयुक्त माहिती देऊन हे पुस्तक एका गाईड- मार्गदर्शकाप्रमाणे काम करेल अशी अपेक्षा आहे. मी कुठल्याही नाडी-ग्रंथ वाचकांचा कोणत्याही प्रकारे नातेवाईक किंवा हितचिंतक नाही. पण वरचेवर भेटी दिल्याने त्यांच्या विषेशतः अगस्त्य नाडी केंद्र-तांबरम व शुगर नाडी केंद्र-टी (त्यागराज) नगर बरोबर खेळीमेळीचे व आपुलकीचे संबंध आहेत.

माझा जोतिष शास्त्राचा काहीही अभ्यास नाही. ठसे, इतर माहिती, पैसे आगाऊ पाठवून नाडी भविष्य मराठीत भाषांतर करून पाठवण्याची गळ घालू नये. मी आपल्या पत्रांना उत्तर देण्यास जबाबदार नाही. मी सध्या नोकरीच्या निमित्ताने तांबरम येथे राहात आहे. पुढे माझी बदली इथून झाली तरी पुस्तकांत पत्ता जुना राहील. ज्यांनी दक्षिणेतील नाड्या किंवा उत्तरेतील संहिता पाहिल्यात त्याना आलेल्या किंवा न आलेल्या अनुभवांची माहिती मला जरूर कळवावी. त्यासाठी खालील पत्त्यावर संपर्क साधल्यास माझ्या बदलत्या पत्त्यावर ती मिळत राहतील.


**- Mr. R. D. Pataskar,**
113, Narayan Peth, Pune 411 030.
**- श्री. आर. डी. पाटसकर,**
११३, नारायण पेठ, सिताफळ बाग कॉलनी, पुणे ४११ ०३०.


# ऋणनिर्देश


'नाडी भविष्य' पुस्तक आपल्या हाती येण्यासाठी श्री. ह. अ. भावे व श्री. श्रीकृष्ण करमरकर या हितचिंतकांनी श्री. दिलीप इंगळे व श्री. अनिल उपळेकर या कलाकारांनी, जाहिरातदारांनी आणि जवळच्या नातलगांनी वेळोवेळी जे सहाय्य केले, त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

काही दिवसांची रजा काढून मद्रासहून आलो असता 'सकाळ पेपर्स लिमिटेड', पुणे यांनी अवघ्या १५/२० दिवसांत हे पुस्तक सुबकपणे छापून दिले व संदेश एजन्सी, श्री. दांगट व श्री. बागवे यांनी वितरणाची जबाबदारी घेतल्याबद्दल त्यांचे व सर्व नोकरबंधूंचे मन:पूर्वक आभार.

नेहा पब्लिकेशन्स पुणे तर्फे सौ. अलका ओक यांनी हे पुस्तक प्रकाशित करण्यासाठी दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल त्यांचे हार्दिक आभार.

शशिकांत ओक

# श्री अगस्त्य नाडी संहिता...
# एक चक्राऊन टाकणारा चमत्कार!

आजच्या विज्ञानाच्या जगात जर कोणी तुमच्या फक्त अंगठ्याच्या ठशावरून तुमचे नाव, आई, वडिल, पति/पत्नीचे नाव, जन्म-वर्ष महिना नव्हे तिथी, तुमचे सध्याचे चालू वय सांगण्यात यशस्वी होत असेल तर तुम्ही त्या भविष्याला काय म्हणणार? जादूगाराची हातचलाखी किंवा तर्काच्या पलिकडे, ज्ञात न होणाऱ्या शक्तीचे हे एक साधे व सहज प्रदर्शन?

नाही ही जादूगाराच्या पोतड्यातील आकर्षक जादू नाही. किंवा अंधश्रद्धा निर्मूलन वाल्यांनी कचाट्यात धरलेल्या साधू-बैराग्यांच्या नादी लागलेल्या भगत गणांना भुलवण्यासाठीची चाल नाही. मग हे आहे तरी काय?

मती गुंग करणारे व सर्व तर्क फोल ठरवणारे हे भविष्य कथन 'अगस्त नाडी'वर आधारीत आहे. प्राचीन काळी विविध ऋषींनी वेगवेगळ्या ठिकाणी आपल्या प्रज्ञाचक्षूंनी पाहिलेले व त्यांच्या शिष्योत्तमांनी अति काटेकोरपणे लिहून घेतलेले हे भविष्य हजारो वर्षांनी नेमक्या व्यक्तिच्या हाती देण्याचे महान कार्य पाहिल्यावर मानवी विज्ञानाच्या कक्षा अजून किती तोकड्या आहेत हे प्रत्ययाला येते.

श्री अगस्त्य नाडी ग्रंथ / लेखाचे अवलोकन करण्याचे भाग्य मला नुकतेच लाभले. त्याचा अनुभव आपणांपुढे मांडून या भविष्याबाबतची सखोल माहिती वाचकांपुढे ठेवावी. व कदाचित आपणास भविष्य पहाण्यास उद्युक्त करावे अशी दैव योजना असेल म्हणूनही हे पुस्तक लिहिण्याचा/ प्रकाशित होण्याचा योग असावा.

मद्रासजवळ एअर फोर्स स्टेशन तांबरम येथे गेल्या वर्षी विंग कमांडर या रँकवर माझी बदली झाली. आमच्या घरापासून ३/४ कि.मी.वर श्री अगस्त्य नाडी निलायम (केंद्र) आहे. याचा सहज बोलता बोलता शोध लागला व एके दिवशी सकाळी मी त्यांच्या केंद्रात दाखल झाला. गेल्या गेल्या एका छोट्याशा कागदावर उजव्या अंगठ्याचा छाप घेऊन झाल्यावर तासाभराने मला आत बोलावण्यात आले. फुटपट्टीच्या आकाराच्या दोन लाकडी पट्ट्यात ओवून घट्टपणे अडकवलेल्या ५०/ ६० ताडपत्राच्या पट्ट्या असलेले एक बंडल घेऊन एक नाडी वाचक माझ्याशी धडाधड तामिळ बोलायला लागला. त्याला थोपवून 'मला तमिळ येत नाही' म्हणताच त्यांच्यात चर्चा झाली. व मला दुपारी बोलावण्यात आले. दुपारी मी फोटोग्राफरला भाषांतर करण्यासाठी व पत्नीस बरोबर नेले होते. आधीच्या लोकांच्या भविष्य कथनानंतर २/२॥ तासांनी आमचा नंबर लागला. तोवर फोटोग्राफरने ३ फोटो काढून काढता पाय घेतला होतान! वेळेवर भविष्य पहावला आलेल्यांपैकी एकाला भाषांतरासाठी पकडून भविष्य वाचनाला सुरवात झाली! या ताडपत्राच्या पट्ट्या साधारण १० -११ इंच लांब १ ते १½ इंच रुंद व लवचिक आहेत. ताडाच्या पंख्यास वापरात येणाऱ्या पानांच्या वर प्रक्रिया करून या पट्ट्या बनल्या आहेत. त्यावर जाड खिळा मुठीत धरून हात न उचलता मोडी पद्धतीने लिहिल्या जाणाऱ्या लिपीत समास सोडून ६ ते ८ ओळीत वेधक पद्धतीने मजकूर लिहिला आहे. श्री अगस्त्य मुनींना नमन करून एक एक पट्टीतील मजकुराच्या अनुषंगाने मला प फ ब भ, यापासून तुमचे नाव सुरू होते का? आईचे नाव चार अक्षरी का? वडील स्वर्गवासी? वगैरे प्रश्न विचारले जाऊ लागले. नकारात्मक उत्तर आले की पुढची पट्टी पहाण्याचा कार्यक्रम सुरू झाला. होता होता ते बंडल संपले. पुन्हा बऱ्याच वेळाच्या विश्रांती (!) नंतर दुसऱ्या व तिसऱ्या बंडलातही माझी पट्टी मिळाली नाही. तेव्हा तोंड वाकडे करत, "इल्ले स्वामी" म्हणत पुढे महिन्याभराने येण्यास सांगितले गेले. पुढे महिन्याभराने गेलो तेव्हा माझ्या अंगठ्याच्या ठशाच्या खुणेचे बंडल श्रीलंकेहून आणवल्याचे कळले. मध्यंतरीच्या काळांत इतरांचे भविष्य पहाण्याचा/ ऐकण्याचा लाभ झाला व मी ही थोडासा या भविष्याला रुळलो होतो. यावेळीही १ बंडल तसेच गेले व त्यानंतरच्या बंडलात ५/६ पत्रानंतरच्या एका पट्टीत आईचे नाव-मंगला, वडीलांचे- जनार्दन, तुमचे नाव- शशिकांत, पत्नीचे नाव-अलका, एक मुलगा- एक मुलगी, वयाच्या ४५ व्या वर्षी भविष्य पहात आहात. या पुढे विरोधी नाम संवत्सर, आडी मासम (आषाढ महिना) १६ वी तिथी, रविवार, चित्रा नक्षत्र, धनुसु- लग्नम व कन्या राशी असा कालमानाचा संपूर्ण आडाखा दिला होता. तेथेच ४० वर्षांचे जाडजूड पंचांग पडले होते त्यात वर वर्णन केलेल्या दिनमानांत कानामात्रेचा ही फरक नव्हता व त्यासमोर इंग्रजी तारीख येत होती. माझी जन्मतारीख ३१ जुलै १९४९! पुढे आई वडिलांचे प्रथम अपत्य, मुले माध्यमिक शिक्षण घेत आहेत. जातक- विद्यावान देशसेवेच्या संरक्षणाच्या संबंधित कार्यात सरकारी नोकरीत उच्चपदावर असा सरळ उल्लेख झाला. पुढे माझी पत्रिका जन्मवेळेच्या ग्रहमानाप्रमाणे सांगितली गेली. ती ही माझ्यापाशी असलेल्या पत्रिकेबर हुकूम जुळली. लाखो ताडपत्रामधून नेमकी माझी



विंग कमांडर शशिकांत ओक अगस्त्य नाडी केंद्र, तांबरम येथे आपले भविष्य पाहताना सोबत श्री. शिवषण्मुगम व इतर.

पट्टी मिळाली होती यात शंका नव्हती. हे पाहून होईपर्यंत बराच वेळ गेला होता. म्हणून मला २ दिवसांनी बोलावले गेले. तोपर्यंत ताडपत्रावरील मजकूर एका ४० पानी वहीत लिहून ठेवला जाणार होता. त्या वेळी इंग्रजीत थोडे फार संभाषण करण्याइतपत जाण असणारा नाडी वाचक श्री राजेन्द्रन हजर होता. तामिळ वाक्य वहीतून वाचून त्यावर तमिळमध्येच स्पष्टीकरण करणे व ३/४ वाक्यानंतर त्यांचा एकंदर अर्थ इंग्रजीत सांगणे असे सर्व टेप केले जात होते. साधारण ३० मिनिटांची एक बाजू भरली. अशी टेप व तामिळमध्ये लिहिलेली वही हे सर्व त्याने वाकून माझ्या हाती सुपूर्त केले. या सर्वांसाठी १०० रु. व टेपचे वेगळे २५ रु. असा रु. १२५ खर्च झाला.

यांच जनरल- स्वस्थानाच्या कांडात श्री अगस्त्य मुनींनी जातकाला (मला) विविध इतर कांडांतील सूक्ष्म व विस्तृत माहिती वाचावी असा डायरेक्ट आदेश दिला होता. त्यामुळे पुढील कांडाचे-कुंडलीतील इतर स्थानांचे वाचन करावे अशी उत्सुकता लागली. पुढील कांडांच्या वाचनात लक्षात आले की साधारण १५ ते १८ श्लोकांच्या ६० ते ७० ओळीत. जातकाचे सर्व आयुष्याचे भविष्य दिले जाते. त्यात पहिला भाग नक्की कोणाचे कुठल्या कांडांचे वाचन चालू आहे याचे वर्णन होते. उदा. माझ्या संदर्भात प्रत्येक कांडाच्या सुरवातीस- धनुसु लग्नम, कन्या राशी- जातकाचे नाव शशिकांत, माता मंगला, पिता- जनार्दन, पत्नी- अलका वयाच्या ४५ व्या वर्षी अवलोकन करत आहात असे म्हटल्यावर चुकीच्या साठी जागा राहत नसे. यापुढे त्या कांडाच्या अनुषंगाने महत्वाची एखादी घटना वर्णन केली जाते व त्यानंतर पूर्वजन्मींच्या पाप/पुण्य कृत्यांमुळे व सध्याच्या चांगल्या वाईट ग्रहमानामुळे बरे/वाईट काय होत आहे याचा स्पष्ट उल्लेख होतो व भविष्यांतील वर्षांचा कधी एकेरी तर कधी २/३ वर्षांच्या साखळीने उल्लेख होतो.

माझ्याबाबत एका कांडात सुरवातीसच अचुक घटनांचे वर्णन झाले. उदाहरणार्थ माझ्या पदोन्नतीस झालेली अकारण दिरंगाई, मुलांच्या शिक्षणात खंड, पत्नीस त्वचा रोग (ॲलर्जीमुळे खाज सुटण्याचा त्रास आहे.) वाहनापासून अपघात. (काही दिवसा आधीकारला समोरून येणाऱ्या वाहनाने धडक दिली. पण वेळीच दक्षता घेतल्यामुळे कारच्या मोडतोडीवर व आम्हा कुटुंबियांना काहीही इजा न होता वेळ निभावली होती) - कोर्ट कचेरीचा प्रसंग! (प्रथम हे खरे वाटले नाही कारण एअर फोर्समधील नोकरीत कुठली कोर्ट कचेरी? पण पुढे डोके खाजवता लक्षात आले की काही महिनेच आधी आपण एका कोर्ट मार्शलच्या संदर्भात महत्त्वाची साक्ष दिली होती!).

या सणसणीत व ताडून पहाता येण्यासारख्या घटनांवरून माझी अशी खात्री झाली की भूतकाळ बरोबर सांगितला जात आहे. माझ्यामुळे एअरफोर्सचे बरेच जण आत्तापर्यंत तेथे भेट देऊन गेले. व प्रत्येकास अचूक माहितीचा अनुभव आला आहे.

भविष्यातील पुढील आडाखे बरोबर यावेत यासाठीचे शांती व दीक्षाकांडातील सुचवलेले पूजा, जप, तप. धार्मिक स्थळांना भेटी, अपंग/अनाथांना अन्नदान वगैरे करणे किंवा न करणे याचा विचार. इतर भविष्याप्रमाणे याही भविष्यामधील सांगितलेले पुढील घटनाक्रम किती बरोबर किती टक्के खरे? या किंवा अशा तऱ्हेच्या भृगू व इतर संहितांचा खरेपणा कितपत? या सर्वांचा व्यापारी दृष्टीकोन काय? देशाचे भविष्य पाहाता येणे शक्य आहे किंवा काय वगैरेचा सखोल अभ्यास व विचार होणे अति आवश्यक आहे.

जिज्ञासू वाचकांपैकी बऱ्याच जणांनी या किंवा इतर दाक्षिणात्य नाडी ग्रंथाचे वाचन केलेले असेल त्यांचे या बाबतचे विवेचन, मार्गदर्शन. इतर वाचकांपर्यंत पोचवण्याच्या दृष्टीने पत्रव्यवहार केला तर मी आभारी असेन.

■

# नाडी ग्रंथ रचना

''प्रस्तुत पुस्तकात नाडी शास्त्रासंबंधी माहिती देऊन सामान्य माणसाला पडणाऱ्या विविध प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न केला गेला आहे. या तऱ्हेचा शोध आधीही बऱ्याच विद्वानांनी, प्रज्ञावंतांनी केला आहे. त्यामानाने लेखक अत्यंत अनुभवहीन व ज्योतिषशास्त्राचा संपूर्ण अज्ञानी आहे. स्वत:ची कुंडली मांडण्या इतकाही लेखकास ज्योतिषाचा गंध नाही. एक जिज्ञासू, नाडी शास्त्राकडे डोळसपणे पहाणारा नाडी ग्रंथाबाबतची मते, मतांतरे मांडणारा, नाडी अवलोकन केलेल्यांचे रंजक अनुभव लोकांपुढे सादर करून, नाडी भविष्याची उत्सुकता असणाऱ्यांना नाडी शास्त्रींचे पत्ते, इतर आवश्यक माहिती एकत्र करून देणारा आणि ज्योतिषशास्त्रातील अनुभवी तज्ञांना काही अनुत्तरीत प्रश्नांची उत्तरे देण्यासाठी उद्युक्त करणारा मात्र जरूर आहे.''

मानवाच्या विविध स्वभाव वैशिष्ठ्यातील एक वैशिष्ट्य असे म्हणता येईल की ''आपणास ज्ञात नसलेल्या प्रत्येक गोष्टीचे ज्ञान करून घेण्याचा ध्यास''. अगदी अनादिकाला पासून याच ज्ञान पिपासेचा तृषार्त मानव प्रत्येक गोष्ट जाणून- समजून घेण्याचा ध्यास घेऊन बसलेला आहे. व त्यात तो यशस्वीही झाला आहे. तरी अशा अनंत गोष्टी अजूनही त्याने शोध घेण्यासाठी वाकुल्या दाखवून उभ्या आहेत.

भारताचा या शोध कार्यात अत्यंत महत्त्वाचा वाटा आहे. त्याला वैभवशाली परंपरा आहे. त्या परंपरेतून काही अदृश्य प्रभावळ भारतामध्ये सदैव जागृत आहे.

भारत हे नुसतेच राष्ट्र, देश किंवा जमिनीचा तुकडा नसून बराच आणखी काही- अदृश्य, प्रतिकात्मक, काव्यात्मक असाही आहे. याचे कारण संपूर्ण जगात भारत हाच एक असा देश आहे की ज्याने आपली सर्व प्रतिभा सत्य आणि सत्याला जाणण्याच्या प्रयत्नात एकवटली, समर्पित केली. जवळजवळ १० हजार वर्षापासून लाखो लोक सतत या एकाच प्रयासाला लागले आहेत. यासाठी त्यांनी विज्ञान समृद्धीला बळी देऊन, दारिद्र्य, रुग्णतेला जवळ केले. पण सत्यशोधन कार्याला कधीच सोडले नाही. यासर्व लोकांचे संत-महात्मांचे, ऋषी-मुनींचे दिव्य आशीर्वादात्मक तरंग या वातावरणात सदैव वास करून आहेत. हे संत- महात्मे, ऋषी-मुनी फक्त महान कवी, चित्रकार, प्रतिभावंत ज्ञानी नसून ते दिव्यतेचे माध्यमही होते. त्यांनी या दिव्यत्वाची द्वारे विविध तऱ्हेने उघडून मानवतेवर विशेष उपकार करून ठेवले आहेत. पण या दिव्य ज्ञानाला जाणण्यासाठी आपणास एका विशिष्ट भावदशेचे होणे अत्यंत महत्त्वाचे आहे. त्याला ज्ञानाच्या लालसेची तहान लागली पाहिजे!

मानवाच्या विविध जिज्ञासांपैकी एक- भविष्यात त्याच्या जीवनात काय वाढून ठेवले आहे हे जाणण्याच्या लालसेला कित्येक ऋषी-मुनींनी हजारो वर्षांपूर्वी विविध प्रकारांनी लिहून ठेवले आहे. त्यालाच नाडीशास्त्र म्हणता येईल.

हे ऋषी-मुनी योगशास्त्रात पारंगत होते हे वेगळे सांगायला नको. योगशास्त्रात विविध दशांचे वर्णन केले गेलेले आहे. त्या समजाऊन घेतल्या तर योगी पुरुषांना त्रिकालाचे ज्ञान कसे होत असते किंवा असावे यावर प्रकाश पडेल. यातील एक छोटा विभाग म्हणजे जातकाचे भविष्य पाहून, त्याचे दर्शन घेऊन त्याची अत्यंत काटेकोर व सूत्रबद्ध नोंद करणे असे मानले तर याबाबत थोडी फार कल्पना येऊ शकेल.

हे अतिंद्रिय ज्ञान कसे प्राप्त होत असावे? अतिंद्रिय ज्ञानाबाबत आणखी वेगळ्या तऱ्हेने विचार कसा करता येईल? हे समजून घेण्यासाठी मनुष्याच्या विविध सूक्ष्म शरीरांची रचना विस्ताराने समजून घेतली पाहिजे. व्यक्तित्वाची सात शरीरात वाटणी करता येणे शक्य आहे.

**पहिले शरीर-** स्थूल शरीर.(फिजिकल बॉडी) जे आपण सर्व जाणतो.

**दुसरे शरीर-** सूक्ष्म शरीर -आकाश शरीर. (इथरिक बॉडी).

**तिसरे शरीर-** अतिसूक्ष्म शरीर- (एस्ट्रल बॉडी).

**चौथे शरीर-** मनस शरीर.(मेंटल बॉडी).

**पाचवे शरीर-** आत्मिक शरीर. (स्पिरीचुअल बॉडी).

**सहावे शरीर-** ब्रह्म शरीर. (कॉस्मिक बॉडी).

**सातवे शरीर-** निर्वाण शरीर.(बॉडी लेस बॉडी).

समजून घेण्यासाठी एका मागे किंवा एकामध्ये एक शरीराची रचना आहे. अशी मान्यता आहे.

असे समजतात की पहिल्या सात वर्षात माणसातील भौतिक- स्थूल शरीराचा विकास होण्यावर भर असतो. त्यात अनुकरण हा स्थायी भाव असतो. बुद्धी, भावना, कामना यांच्या विकासाचा अभाव असतो. अशा

व्यक्तित व पशूत फार अंतर नसते. पशूंचेही भौतिक शरीर विकसित असते. इतर शरीर मात्र अविकसितच असतात.

पुढील सात वर्षांत भाव शरीराचा विकास होतो यौवन परिपक्वता येते. व्यक्तिचे भाव जगत विकसित होते. त्यापुढील सात वर्षात सूक्ष्म शरीराचा विकास होतो त्यावेळी तर्क, विचार, बुद्धीचा विकास होतो. दुसऱ्या शरीराच्या विकासानंतर एक प्रकारची कुमार प्रौढता येते. निसर्ग या शरीरापर्यंत विकास करण्यास पूर्ण सहाय्यक असतो. पण या शरीराच्या विकासानंतर माणूस 'नागरिक' बनू शकत नाही. तिसऱ्या शरीराच्या विकासानंतर विचार, तर्क, बुद्धी यांच्या विकासाचे मार्ग शिक्षण, संस्कृती व नैतिकतेमुळे खुले होतात. कदाचित याच कारणांमुळे २१ वर्षाचे झाल्यावर मतदानाचा हक्क जगभरच्या देशास व्यक्तिस मिळतो.

तिसऱ्या शरीराच्या विकासानंतर बहुतेक लोक याच शरीरात अडकून पडतात व मरेपर्यंत तेथेच घोटाळत राहतात. चौथ्या मनस शरीराचा विकास त्यांच्यात होऊ शकत नाही. मनस शरीराचे अनुभव फारच अनोखे व अद्‌भूत असतात. जसे संमोहन, टेलिपथी, क्लेयर व्हॉईस, दुसऱ्याच्या मनातील विचार जाणणे वगैरे. या शरीरात सामान्य सत्य (कॉमन रिॲलिटी) मागे पडते. उदा. हातातील वस्तू इतरांना दाखवून ती आहे किंवा नाही याची परीक्षा करता येईल. व इतरांना त्या सामान्य सत्याचा पडताळा पाहता येईल. पण व्यक्तिच्या डोक्याच्या विचारांच्या दुनियेत दुसऱ्याला सहभागी कसे करता येणार? तेथूनच वैयक्तिक वैचारिक जगत चालू होते. कुठल्याही गोष्टीचे सत्य/ असत्यतेचे बाह्य नियम संपून जातात. कारण आता त्याच्याकडे अशी कसोटी नाही ज्याच्यावर तो पारख करेल की मला जे घडते आहे ते खरोखरच घडतेय की मी नुसतीच कल्पना करतोय!

याच शरीराच्या विकासात बरेच तांत्रिक मांत्रिक अडकलेले आढळतात.जादू टोण्याच्या काळ्या विद्येत अडकून बदनाम होतात. या शरीरात विविध सिद्धींची प्राप्ती पण होते. या शरीरात आणखी घटना घडते ती ही, की कुंडलिनीची जागृती! शरीर शास्त्रातील तज्ञ (फिजिऑलॉजिस्ट) कुंडलिनीचे अस्तित्व सापडत नाही म्हणून मानत नाहीत. कारण कुंडलिनी ही चौथ्या म्हणजे मनस शरीरात विकसित होणारी घटना आहे. कुंडलिनी विकासाचे एक फलित म्हणजे अद्‌भूत व अलौकिक भविष्यकाळाचे दर्शन व कथन.

पाचव्या आत्मिक शरीरातील विकास हा चौथ्या शरीरातील विकासाचा एक पडाव आहे. घर, टी.व्ही. म्हटले की त्या शब्दाच्या मागचा आशय स्पष्ट होतो. पण आपणास 'आत्मा' हा शब्द माहित आहे पण त्याचा अनुभव नसल्याने आशय लक्षात येत नाही. जे तो आशय जाणतात ते पाचव्या शरीरातील व्यक्ती होत व ते मोक्षाच्या उंबरठ्याशी पोचले असे मानले जाते. मात्र काही जण, ''बस सर्व काही मिळाले'' म्हणून तेथेच थबकून जाण्याची चूक करतात.

सहाव्या शरीरात मोक्षाला पार करून 'ब्रह्म' मिळवण्याची संभावना आहे. तेथे मुक्त आहे ना अमुक्त, जे आहे त्यात तो एक झाला आहे. ''अहम ब्रह्मास्मि'' ची घोषणा सहाव्या शरीराची निशाणी आहे. यापुढे आणखी एक पाऊल...... एक उडी..... शेवटची जिथे ना अहं आहे ना ब्रह्म आहे, जिथे तू व मी दोन्ही नाही, जिथे काहीच नाही-परमशून्य-(टोटल अबसोल्यूट व्हॉईड) ते निर्वाण-सप्त शरीर!

वर उल्लेख केलेल्या चौथ्या शरीरा पुढील स्वरूप कल्पनेचे आहे. कल्पना करणे म्हणजेच स्वप्न! आपले मन स्वप्ने पहाण्याचे व कल्पनेचे मनोरे बांधण्याचे काम रात्रंदिवस करत असते. याच कल्पनेचे चरम रूप विकसित होऊन तो संकल्प (विल) बनतो. आणि स्वप्न पहाण्याच्या क्षमतेचे पूर्ण विकसित रूप अतिंद्रिय दर्शन बनते! (व्हीजन किंवा सायकिक व्हीजन)

कोणी जर स्वप्नांचे अतिंद्रिय दर्शनात रूपांतर करू शकला तर डोळे बंद करूनही तो ती वस्तू पाहू शकतो. तो स्वप्न पहातच नाही. सत्य सृष्टीचे दर्शन घेतो. त्यात तो भिंती पलीकडेही पाहू शकतो, दुसरा काय विचार करतोय ते पाहून व समजून दर्शन घेऊ शकतो. 'व्हीजन' याचा अर्थ टाईम (काल) व स्पेस (स्थान) यातील अंतर संपवून ज्याला सर्व गोष्टी अंतर्ज्ञानाने दिसतात ऐकू येतात! अतिंद्रिय दर्शनातूनच नाडी ग्रंथकारांना हजारो वर्षांनी उत्पन्न होणाऱ्या लाखो मनुष्यांचे अचूक व साद्यंत ललाट लेख वाचण्याची प्रेरणा मिळाली असावी. त्या सर्वांचे दर्शन घेऊन मानव जातीला त्यावेळी निर्माण होणाऱ्या चिंता, कष्ट, दुःखे नाहीशी करता येणे शक्य असल्यास त्यांचा उल्लेख करून मानव जातीला प्रेम, सुख व शांती मिळण्यास मदत करण्याच्या उदात्त हेतूनेच हे प्रचंड कार्य हाती घेतले असावे.

अन्यथा कुठल्याही तऱ्हेच्या धनाचे, मानाचे किंवा पदाचे प्रलोभन नसताना मानवासाठी केलेली ही निष्काम सेवा कोणत्याही मापने मोजता येणे शक्य नाही.

हे सर्व कसे झाले असावे? किती मुनी-महर्षि या अतिंद्रिय ज्ञानाला प्राप्त झाले असतील? किती व कोण लोक या ज्ञानाला लिहून ठेवण्यासाठी सिद्ध असतील? लेखन कार्य किती काळ चालू असेल? लेखन साहित्य कोणते असेल? बनलेले साहित्य जपून ठेवण्याच्या दृष्टीने काय काय योजना असाव्यात? हे सर्व साहित्य ज्याच्यासाठी लिहिले आहे त्याला हे वाचायची प्रेरणा कशी द्यायची? तो वाचनासाठी आला तर त्याचे नेमके पान त्याच्या हाती पडण्यासाठी कोणती अनुक्रमांकाची (इंडेक्सिंग) पद्धती वापरायची असे अनेक प्रश्न उद्‌भवतात.

**आतापर्यंत माझ्या वाचनात व चर्चेत नाडी ग्रंथांच्या लेखनाबाबत**

काही तर्क आले आहेत. या सर्वांवरून मी असे चित्र रंगवतो की श्री अगस्त्य किंवा इतर सर्व नाडी कर्त्यांची विविध ठिकाणी गुरूकुले असावीत. आत्मज्ञान- वेद-उपवेद यावरील (शिष्यांच्या दृष्टीने) दुर्बोध व किचकट शिक्षणामुळे येणारा शिणवटा घालवण्यासाठी आयुर्वेद, ज्योतिर्वेद, धनुर्वेद, स्थापत्य कला, चित्रकला, नृत्य, संगीत हे विविध विषय तितक्याच आत्मियतेने शिकवले जात असतील. काही शिष्यांनी त्या त्या विषयात पारंगतता मिळवली असेल. या विशारद शिष्यांचे मोठ्या प्रमाणात चर्चासत्र वादविवाद, मंचावर - राजदरबारी घडवले जात असावेत. या विशारदांच्या ज्ञानाची गंगा मानव जातीच्या कल्याणासाठी सत्कारणी लागावी या हेतूने गुरूकुल प्रमुखांच्या निर्देशनाखाली हे नाडी ग्रंथ लेखन कार्य घडले असावे.

चित्र पुढे असेही रंगवता येईल. की गुरू पहाटे पहाटे आपल्या २००/३०० शिष्यांसमवेत ध्यानाला बसून एका सामुहिक मानसिक अवस्थेत (कलेक्टीव्ह माईंड) नेत असावेत. त्यामुळे सर्वच शिष्य गुरूंप्रमाणे भूत-भविष्य वेगवेगळ्या व्यक्तींचे पहाण्यासाठी तयार झाले असावेत.

शिकाऊ विद्यार्थी गण २/३ च्या संख्येने प्रत्येक विशारदाच्या भोवती बसून ध्यानस्थ होऊन भूत-भविष्यात अवगाहन करत असताना द्रष्टेपणाने ज्या जातकाच्या कुंडलीची माहिती दिली जात आहे ती भराभरा टिपून घेत असावेत. ती ध्यान समाधी अतिशय कमी वेळ टिकणारी असल्याने ५/१० कुंडल्यातच त्या दिवशीचा वेळ संपत असावा. आता या कच्च्या टिपणांचे एकत्रपणे पुन्हा बसून पक्के टिप्पण ठरवताना, ऐकताना, लिहिताना झालेल्या चुकांची आपापसात चर्चा करून दुरुस्ती करून शक्यतो बरहुकूम मसूदा भूर्जपत्रावर नोंदण्यासाठी बनवला जात असावा.

त्याच वेळी अगदी नवशिके विद्यार्थी आसपासच्यां जंगलात, गुरूकुलातील शेतात लावलेल्या/ उगवलेल्या ताडाच्या (पालमिरा) झाडांच्या पानांचे वर्गीकरण करून एकसारख्या आकाराचे करून भोके पाडून त्यावर रासायनिक प्रक्रिया करून जणू काही टायपिंगला ठेवलेल्या गठ्ठ्यांसारखी- तयारी करून ठेवत असावेत.

आणखीन असेच काही 'श्रे' शिष्य- विशेषत: तमिळमधील कूटलिपी प्रशिक्षित विद्यार्थी रोज अंधार होण्याच्या आत विशिष्ट खिळ्याप्रमाणे धारदार लेखणीस मुठीत धरून लिहिण्याच्या पद्धतीने पक्क्या मसूद्याचे त्या ताडपत्रावर कोरून लिखाण करून ठेवत असतील.

आणखी काही विद्यार्थी पक्क्या ताडपत्र्यांची अंगठ्यांच्या ठशांच्या १०८ विभागात वर्गवारी लावणे, त्यांना ५०/६० च्या बंडलात दोन लाकडी पट्ट्यात दोरीने पक्के बांधून वाचनासाठी तयार करत असावेत. गुरूकुलात अशा प्रकारे तयार झालेला भविष्याचा 'माल' संपूर्णपणे सुरक्षित ठेवण्यासाठी गुरूंनी आधीच आसपासच्या राजा-महाराजाशी संधान बांधून- कदाचित तो त्यांचा राजकारण युद्ध विद्या, न्याय व इतर विद्यांचे ज्ञान घेण्याच्या संदर्भात शिष्यही असावा- त्या राज्यातील मोठ- मोठ्या देवालयात सुरक्षित ठेवण्यास पोचते करीत असतील. अनेक गुरूकुलात असे कार्य शेकडो वर्षे चालत राहिल्याने थोडे थोडे लिहूनही लाखो पत्रे जमली असावीत. (वरील चित्र रंगवत असताना 'आपली बोटे' हे लिहित नसल्याचा आभास प्रस्तुत लेखकास वाटत होता.)

मध्यंतरीच्या काळात गुरूकुलात पडणारा नैसर्गिक खंड, मतभिन्नता, राजेराजवाड्यातील सत्ता संघर्ष, नैसर्गिक आपत्ती, देवालयातील पूजाऱ्यांचे हेवेदावे वगैरे सर्व अडचणींना व संकटांना तोंड देत ही पत्रे आजतागायत टिकली आहेत.

मध्यंतरीच्या काळात काही वेळा ताडपत्र्यांची अनुपलब्धता, कच्च्या लेखन मसूद्याचे पक्क्या लेखनास लागणारा वेळ न मिळणे, गडबडीत पत्रे कोरणाऱ्याचे लक्ष इतरत्र गेल्याने चुकीची माहिती कोरली जाणे वगैरेही

## वाचकांना नम्र विनंती :-

दि. १ ऑगस्ट ९४ च्या सह्याद्रिच्या अंकात नाडी ग्रंथावर आलेल्या लेखामुळे बऱ्याच वाचकांनी या लेखकाकडे पत्र रूपाने धाव घेतली आहे. बऱ्याच जणांनी अंगठ्यांचे ठसे व इतर माहिती पाठवून पैसे पाठवून नाडी ज्योतिष पहाण्याची गळ घातली आहे. लेखक त्यांच्या भावना जाणतो. पण स्वत:ची नोकरी व इतर कामातील व्यस्तता यामुळे कोणाचेही काम स्वीकारून, नाडी वाचकांकडे अंगठ्यांचे ठसे देणे, दिलेल्या वेळेला जाऊन योग्य त्या ताडपत्राची शोधाशोध करण्यासाठी तासंतास तिष्ठत बसणे, वही व टेप तयार करून घेणे व ज्यांनी पैसे न पाठवता नुसतेच अंगठे पाठवलेत त्यांच्यासाठी पदरचे पैसे भरणे त्याला कसे शक्य आहे ? याची वाचकांनी नोंद घ्यावी.

अशा दूरस्थ भागात येऊन भविष्य पहाणे कसे जमेल? भविष्य पहाण्यासाठी त्या व्यक्तिने येणेच कसे आगत्याचे आहे. येथे येण्या/राहण्याच्या कशा सोई आहेत याबाबत पुढील प्रकरणांत खुलासा केलेला आहे.)

न कळत घडत असावे. या सर्व खटाटोपाचा प्रचंडपणा इतका मोठा आहे की त्यात क्षुल्लक चुकांना भरपूर वाव आहे.

असे सर्व सुरक्षित साहित्य पुन्हा त्या त्या काळात, विभागात पोचते करणे व ज्यांच्या बाबत ते लिहिले गेले आहे त्यांना ते वाचायला प्रेरित करणे याबाबतही काही योजना असावी. गुरूकुलातील काही विशारद या ताडपत्र्यांना घेऊन विविध ठिकाणी गृहस्थाश्रम मांडून स्थिर झाले असावेत. कालांतराने त्यांची मते/ मतांतरे सत्ता संघर्षामुळे निर्माण होणारी कृत्रिम भौगोलिक बंधने यामुळे प्रचंड ग्रंथ संपदेचे तुकड्यात रूपांतर झाले असावे. याशिवाय मध्ययुगीन परधर्मियांच्या अत्याचारी आक्रमणामुळे पत्रांची नासाडी या सर्वांवर मात करून आज या नाड्या सध्याच्या लोकांसाठी भविष्य सांगण्यास सिद्ध आहेत.'

असे असताना या नाडी ग्रंथांकडे नाक मुरडून दुर्लक्ष करणे किती योग्य आहे'.... ?

■

## मराठी महिन्यांची तमिळ नावे

| महिना क्रमांक | मराठी महिना | तमिळ महिना | महिना क्रमांक | मराठी महिना | तमिळ महिना |
|---|---|---|---|---|---|
| १ | चैत्र | सित्रै | ७ | अश्विन | ऐप्पसी |
| २ | वैशाख | वैहासी | ८ | कार्तिक | कार्तिकेयी |
| ३ | ज्येष्ठ | आनी | ९ | मार्गशीर्ष | मार्घळी |
| ४ | आषाढ | आडी | १० | पौष | तै |
| ५ | श्रावण | आवनी | ११ | माघ | मासी |
| ६ | भाद्रपद | पुरट्टासी | १२ | फाल्गुन | पाकुनी |

## मराठी राशिंची तमिळ नावे

| राशि क्रमांक | मराठी नाव | तमिळ नाव | राशि क्रमांक | मराठी नाव | तमिळ नाव |
|---|---|---|---|---|---|
| १ | मेष | मेषम् | ७ | तूळा | तूलाम् |
| २ | वृषभ | रिषबम् | ८ | वृश्चिक | वृश्चिहम् |
| ३ | मिथुन | मिद्धुनम् | ९ | धनु | धुनुसू |
| ४ | कर्क | कटहम् | १० | मकर | मकरम् |
| ५ | सिंह | सिम्मम् | ११ | कुंभ | कुम्बम् |
| ६ | कन्या | कन्नी | १२ | मीन | मीनम् |

## मराठी तिथ्यांची तमिळ नावे

| तिथी क्रमांक | मराठी तिथी | तमिळ तिथी | तिथी क्रमांक | मराठी तिथी | तमिळ तिथी |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्रथमा | प्रथमै | ९ | नवमी | नवमी |
| २ | द्वितीया | तुदियै | १० | दशमी | दसमी |
| ३ | तृतिया | तिरुदियै | ११ | एकादशी | एकादशी |
| ४ | चतुर्थी | चतुर्थी | १२ | द्वादशी | त्वादशी |
| ५ | पंचमी | पंचमी | १३ | त्रयोदशी | त्रयोदशी |
| ६ | षष्ठी | सष्टी | १४ | चतुर्दशी | चतुर्दशी |
| ७ | सप्तमी | सप्तमी | १५ | पौर्णिमा | पौर्णमी |
| ८ | अष्टमी | अष्टमी | - | अमावस्या | अमावासै |

## वार आणि नव ग्रह यांची मराठी-तमिळ नावे

| ग्रहाचे नाव | मराठी वार | ग्रहाचे नाव | तमिळ वार |
|---|---|---|---|
| रवि/सूर्य | रविवार | सूर्य/रवि | न्याईस |
| चंद्र | सोमवार | चंद्रन | तिंगल |
| मंगळ | मंगळवार | सव्वाय् | सव्वाई |
| बुध | बुधवार | बुधम् | बुधन् |
| गुरु | गुरुवार | गुरु | वियाराईन् |
| शुक्र | शुक्रवार | शुकिरम् | वैल्ली |
| शनि | शनिवार | सनि | सनि |
| राहू | - | राहूम् | - |
| केतू | - | केतुम् | - |

# नाडी ग्रंथ संहितेचा इतिहास

आधीच्या लिखाणात अतिंद्रिय दर्शन योगी-महर्षि द्रष्टे यांना कसे होत असावे. नाडी भविष्याची रचना कशी झाली असावी याबाबत माझे काल्पनिक मत आपण वाचलेत.

आता नाडी शास्त्री, इतर मान्यवर विद्वान यांची काय मते आहेत ते पाहू.

स्व. बाबूभाई छाया ज्योतिषशास्त्री, सूर्य संहिता वाले, मुंबई यांचे विचार वाचनात आले. ते असे. संहिता- नाडी निर्मितीचा इतिहास संहितेच्या पट्ट्यामधून लिहिला होता. त्यानुसार अशी धारणा होते की, लाखो किंवा कोट्यवधी वर्षापूर्वी हिमालयाच्या परिसरात त्या काळातील त्रिकालज्ञ योगी जमले होते. त्यांनी अनंतकाळपर्यंत या पृथ्वीवर जन्माला येणाऱ्या जीवांची भविष्ये पाहिली. आणि त्या बाबत परस्परात चर्चा करून त्यांनी काही निर्णय निश्चित केले, त्यावेळी जे संवाद झाले; त्याचे दक्षिण भारतातून आलेल्या कारागीर मंडळींनी टिप्पण करून ठेवले. त्या मंडळींना ताडपत्र्यावर अक्षरे कोरण्याची कला अवगत होती. त्यांनी या संमेलनाचे संवाद कोरून ठेवले. हे संमेलन कित्येक वर्षे चालू होते! संमेलन संपले. टिपणाच्या वह्या (?) साहित्य अवाढव्य झाले होते. दक्षिणेतील मंडळी आप आपल्या राहत्या भागात परतू लागली. वाहतूक वाहनांची त्यावेळची दशा, नैसर्गिक व मानवी आपत्तीमुळे हे प्रचंड लेखन कार्य कोरणाऱ्यांच्या तिसऱ्या, चौथ्या पिढ्यातच नष्ट होऊ लागले. या सर्वांची कल्पना असल्याने भृगू, कर्दम, मैत्रेय, वसिष्ठ, ब्रह्मा, कृष्ण, प्रल्हाद, आणि बळी या महर्षींनी वेगवेगळ्या वेळी संपर्क साधून प्रत्येकाने आपआपली माहिती पुन्हा लिहून काढली व तपासणी कार्य सूर्य ऋषींकडे दिले. त्यांनी त्या त्या ऋषींच्या नावाने संहितांना मान्यता दिली. पुढे या नऊ संहितांमध्ये प्रत्येकी ३ पोट प्रकार पडले. पण कालांतराने नष्ट होत होत. सूर्य व भृगू संहिता २० व्या शतकापर्यंत बऱ्याच ठिकाणी उपलब्ध आहेत.

वरील वक्तव्यात थोडी फार विसंगती वाटते. योग्यांचे संमेलन नक्की केव्हा व कुठे झाले होते? जे ऋषी जातकाचा (व्यक्तीचा) जन्म- दिनांक, वार, महिना, साल, व व्यक्तीची नावे व जन्मस्थान यांचा अचूक पत्ता सांगतात. ते या साहित्य निर्मितीचा काल, स्थल याचा ''लाखो किंवा कोटी वर्षे'', ''हिमालयात कुठेतरी'' असा भोंगळपणाचा उल्लेख कसा करू शकतील? दक्षिणेतील कारागिरांनी जर आपणाबरोबर हे कोरीव साहित्य नेले व ते आजही तेलगू, तामिळ व मल्याळम या दाक्षिणात्य भाषांमध्ये उपलब्ध आहे. तर मग भृगू व इतर संहितांचा उत्तरेत पुस्तक रूपाने सुळसुळाट झालाच कसा? संहितांचे पोट प्रकार कोणते? वगैरे प्रश्न अनुत्तरितच राहतात.

डॉ. आर. नागराज शर्मा यांच्याकडे 'सप्तर्षी नाडी' आहे. ते स्वत: विविध लेख लिहून या नाडीमधील माहिती वाचकांना देत असतात. अति अभ्यासू असल्याने त्यांच्या लेखात ज्योतिषशास्त्रीय संज्ञा व आडाखे यामुळे आपणांसारख्या प्राथमिक जुजबी माहितगारांना त्या लिखाणाचा पटकन कंटाळा येतो त्यांनी एके ठिकाणी म्हटले आहे की, 'सप्तर्षी नाडी' ची सुरवात 'पार्वती व पराशरांच्या' संवादातून सुरू होते. महाशिव वाक्यम वा इतर पौराणिक कथामधून शिव पार्वतीला बिकट प्रश्नांच्या उत्तराची उकल, सर्व समावेशक ज्ञानाचा उपदेश देतात. व उपस्थित ऋषीमुनी त्या ज्ञान गंगेचा लाभ घेतात. या नाडीत मात्र शिवजी (बहुधा तांडव नृत्य करण्याच्या प्रॅक्टिसमध्ये गुंतले असल्याने?) ऐवजी पराशर ऋषीच पार्वती मातेला विविध जातकांचे भविष्य सांगून मनरंजन करीत आहेत. त्यात काही ठिकाणी अत्री व इतर ५ ऋषीही चर्चेत भाग घेऊन आपली मते देतात. विश्वामित्र व वसिष्ठ यांच्यातील मता/ मतांतरातील स्पर्धात्मक दृष्टीकोन आपणांस माहितच आहे येथेही त्याचा प्रत्यय वादावादी व मतभिन्नता यामधून दिसून येतो.

श्री. शर्माजी पुढे असे म्हणतात, या संवादाच्या घाटणीवरून असे वाटते की, परमपिता परमेश्वराला वंदन करून आशिर्वाद मागायला आलेल्या ऋषी-मुनींची पार्वतीमातेने एक सभा घेतली असावी. अध्यक्षपद तिनेच सांभाळले असावे. पूर्व जन्मातील कर्म गतीने व पाप पुण्याच्या तोलामापाने मनुष्यजात जीवन संग्राम लढण्यात जुंपलेली आहे. त्या सर्वांच्या समाधानासाठी दु:खनाशाचा काही उपाय करता येणे शक्य आहे काय? की जेणे करून पुढे येणाऱ्या त्रासाच्या, कष्टाच्या काळाचा काही श्रद्धा, भक्ती, भावाने उपचार करून मानवाच्या दु:खाचा भार हलका होईल तसेच ज्ञानी प्रज्ञावंतांना पुढे होणाऱ्या ज्ञानप्राप्तीसाठी वेळीच तयार करण्यासाठी उद्युक्त करणे, वेळेवर धोक्याच्या सूचना देणे हाच नाडी ग्रंथ लिहिण्याच्या मागचा उदात्त हेतू असावा.

वरील विवेचनही बरेचसे भोंगळ व पौराणिक स्वरूपाचे वाटते. पण हेतूबद्दलचा उल्लेख जास्त संयुक्तिक वाटतो. याच डॉ. नागराज शर्मांनी दुसऱ्या लेखा संबंधात एके ठिकाणी आपले स्वत:चे जे मत मांडले आहे. ते मात्र धक्कादायकच म्हणावे लागेल. त्यांना नाडी लेखक जे कोणी योगी महर्षी आहेत त्यांना अंर्तज्ञान ESP (एक्स्ट्रा सेन्सरी पर्सेप्शन) अतिंद्रिय शक्ती किंवा दृष्टी याशी नाडी भविष्याचे काही घेणे/देणे असावे असे मुळीच वाटत नाही. त्यांच्या मते प्रचलित ज्योतिष शास्त्राचे साहित्य व त्यातील अचूक माहिती या वरून नक्षत्रांच्या स्थितीवरून असंख्य कुंडल्या तयार केल्या व त्यावरून ग्रहांच्या स्थितीशी गणिती मेळ घालून भविष्य तयार केले असावे. हे मत अंधश्रद्धा निर्मूलन करणाऱ्यांच्या विचारांकडे झुकणारे आहे. पण मग या नाडी ग्रंथात व्यक्तींच्या नावा- गावाचा उल्लेख हा नुसत्या ग्रह तारे व नक्षत्रांच्या स्थितीवरून कसा काय सांगता येईल? याच फलज्योतिष शास्त्राचा आधार घेऊन रस्त्यावर तंबू ठोकून बसलेल्या कुडबुड्या ज्योतिषापासून ते झी टी.व्ही. फेम ज्योतिषापर्यंत कोणाही ज्योतिषाने जातकाचा अंगठा पाहून वा इतर तऱ्हेने नाव/ गाव धडाधड सांगून चकीत केल्याचे ऐकिवात नाही.

**किंबहुना प्रस्तुत लेखकांस याच एका आश्चर्याने नाडी ग्रंथांच्या भविष्याकडे आकर्षित केले. अन्यथा प्रस्तुत लेखक वर्तमानपत्रे, मासिके यातील भविष्याकडे ढुंकूनही पाहात नाही.**

डॉ. शर्मांकडे असलेल्या सप्तर्षी नाडीत जातकाचे नाव व इतर तपशील नसतो. त्यामध्ये या या जन्मनक्षत्रात व या ग्रहस्थितीत निर्माण झालेले जातक. या या भविष्याच्या चाकोरीतून जाईल असा आडाखेबद्ध मजकूर असतो. सप्तर्षी नाडीमधील काही वेचक भविष्य डॉ. शर्मांनी अंशांच्या विचाराने (किचकट असल्याने जास्त न लिहिलेले बरे) मांडले होते. ते वाचून असे मत त्यांचे झाले असावे. पण इतर नाडी ग्रंथातील नावांचा उल्लेख कसा याचे डॉ. शर्माजी उत्तर देत नाहीत.

साधारण याच पद्धतीवर उत्तरेत विशेषत: हिंदीत व मराठीत काही संहिता पुस्तक रूपाने प्रसिद्ध झाल्या आहेत. प्रत्येकांचा दावा अर्थातच 'असली' असल्याचा आहे. त्यामध्ये पुस्तकातील सुरूवातीची बरीच पाने विविध वर्षात जन्मलेल्या स्त्री-पुरुषांच्या कुंडल्या मांडलेल्या असतात. व त्या सर्व कुंडल्यांना नंबर देतात. आपण आपली कुंडली जन्म वर्षाच्या (सालाच्या) अनुषंगाने जुळवायची व त्या नंबरच्या समोरील भविष्य. पुस्तकातील पानांवर वाचायचे. यामध्येही नाव, मातापिता, पतीपत्नीचे कुठेही नाही. जन्मदिनांक, महिना, संवत्सर याचा उल्लेख नाही. ठोकळमानाने आडाखेबद्ध भविष्य पानभर २ मिनिटांत वाचून होते. व यातील काहीच आपल्या गत व सध्याच्या घटनांशी जुळणारे आहे असे जाणवते.

बंगलोरहून प्रसिद्ध होणाऱ्या दि ॲस्ट्रॉलॉजिकल मॅगझीन (Astrological Magazine) चे संपादक डॉ. बंगलोर व्यंकटरामन. उर्फ बी व्ही रामन यांना १९७० च्या सप्टेंबर- ऑक्टोबर मध्ये हिंदू भविष्य शास्त्रावर माहिती देण्यासाठी लंडन येथे बोलावले गेले होते. त्या भाषण मालिकेत त्यांनी एक भाषण "नाडी भविष्य" शास्त्रावर दिले. श्री. रामन फलज्योतिष शास्त्राचे अधिकारी व्यक्ती होत. त्यांच्या भाषणाचा जोर नाडी ग्रंथामधून दिलेल्या जातकाच्या भविष्याच्या व ज्योतिषशास्त्रामध्ये दिलेल्या विविध आडाख्यांचा कसा परस्पर संबंध लावता येतो. यावर होता. नाडी भविष्यामधील सिद्ध पुरुषांनी लिहिलेले भविष्य व फलज्योतिषातील विविध ठोकताळे, योग, कुंडल्या बनवण्याची पद्धती. यावरून नाडी ग्रंथ शास्त्र अत्यंत प्रगत व दैवी आहे, असे मत मांडले. ते पुढे म्हणाले, गेली २० वर्षे मी नाडी शास्त्राचा अभ्यास करत आहे. व १९७२ पर्यंत मी पुस्तकही लिहिणार आहे. (प्रस्तुत लेखकास त्या पुस्तकाचे नाव मात्र अजून कळलेले नाही) नाडी ग्रंथ शास्त्र हे हिंदू संस्कृतीचे महान व अद्वितीय साहित्य आहे. काही युरोपियन लोकांची अशी समजूत आहे की, अलेक्झांड्रीया येथील पुस्तकालयाला आग लावली गेल्यानंतर त्यावेळी अनेक शास्त्रांच्या ज्ञानांच्या चाव्या त्या बरोबरच भस्मसात झाल्या व मानव त्या दिव्य ज्ञानाला, पारखा झाला. पण तसे जरी झाले असले तरी मला असे अभिमान पूर्वक सांगावेसे वाटते की, अशा बऱ्याच शास्त्रांच्या ज्ञानशाखांच्या चाव्या नव्हे तर चाव्यांचे जुडगे भारतात सुरक्षित आहेत व मानवतेची मूकपणे सेवा करण्यात यशस्वी झालेले आहेत. त्यापैकी एक हे नाडी ग्रंथ होत. या ग्रंथांचे सखोल संशोधन केल्यानंतर हे ध्यानात येते की, पराशर ऋषींनी जे आडाखे, योग यांचा उल्लेख केलेला आहे. त्याचा लाभ या नाडी ग्रंथकारांना झाला असावा. हे मोठ्या प्रमाणात तयार झालेले साहित्य संक्षिप्त व श्लोकबद्दल असल्याने पाठ करून ठेवणे सोईचे झाले असावे. स्व. श्री. सूर्यनारायण राव या माझ्या आजोबांनी साठ वर्षापूर्वी (साधारण १९१० साली) एका नाडीचे अवलोकन केले होते. त्यानंतर माझ्या वाचनात आलेल्या नाडी ग्रंथांची नावे अशी : बुध नाडी, शुक्र नाडी, सरस्वती नाडी, सत्य नाडी, चंद्र नाडी आदि...

श्री. एस. कन्नन यांनी ६८-६९ साली ॲस्ट्रॉलॉजिकल मॅगझीनमध्ये १० लेखांची मालिका लिहिली होती. त्यातील माहिती विविध ठिकाणी येईलच. (सध्या हे गृहस्थ कोठे असावेत. या संबंधी शोध चालू आहे.) ते एके ठिकाणी म्हणतात, १९५२ सालच्या सुमारास श्री. गोपाळ कृष्ण राव यांच्याशी विविध नाड्या कशा बनल्या? त्यांच्या



(पान ११ पहा)

# जुन्या ज्योतिष केंद्रांची परिस्थिती सद्य

**कै.** शांताराम आठवल्यांनी लिहिलेल्या 'नाडीग्रंथ' पुस्तकास जवळजवळ ३० वर्षे उलटून गेली आहेत. या दीर्घ काळात त्यात वर्णन केलेल्या नाडीशास्त्रींच्या ज्योतिष केंद्रांची माहिती जुनी झालेली असल्याने उत्सुक वाचकास ती निरुपयोगी ठरण्याची शक्यता वाटून आजच्या घटकेला त्या केंद्रांची काय स्थिती आहे? ते कोण चालवतो. ते ग्रंथ पाहायला आता किती खर्च येतो, बदललेले पत्ते कोणते वगैरे वाचकांच्या पुढे ठेवावे, या उद्देशाने पोस्टाद्वारा वा प्रत्यक्षात भेटीस पाठवून संपर्क साधण्याचा प्रयत्न जुलै १९९४ मध्ये केला. तो सर्व सविस्तर दिला आहे.

**१) श्री. घाणेकर शास्त्री :**

जुना पत्ता : हुजूरपागा पिछाडी, दाढीवाले दत्त मंदिरात चौकशी, नारायण पेठ, पुणे.

सद्यपरिस्थिती : काही वर्षांपूर्वी शास्त्रीजींचे निधन झाले. त्यानंतर कोणीही नातेवाईक त्यांची गादी चालवण्यास पुढे आला नसावा, असे अंजली प्रकाशनचे आनंद साने यांनी पत्राद्वारा कळवले आहे.

**२) श्री. सूर्यनारायण व्यास :**

सूर्यसंहिता- उज्जैन श्री. सूर्यनारायण व्यासांना पद्मभूषण पदवी प्राप्त झाली होती. सध्या ते हयात नाहीत. त्यांचे चिरंजीव डॉ. पंडित रश्मीकांत व्यास त्यांची गादी पुढे चालवतात. ते ज्योतिषी, महामहोपाध्याय, हस्तरेषा विशेषज्ञही आहेत. सूर्यसंहितेमधून जीवनफल पाहायला, भेटून किंवा पोस्टाने पाठवण्याची ते व्यवस्था करतात. त्यासाठी जन्मस्थान, जन्मपत्रिका, प्रश्न किंवा विशेष माहिती हिंदी किंवा इंग्रजीतून पाठवावी. पाठवल्याच्या साधारण १५ दिवसांत उत्तर मिळेल. सध्या (१५ ऑगस्ट १९९४) सर्वसाधारण भविष्य पाहायला ५५१ रु. आणि विस्तृत माहितीसाठी ११११ रुपये घेतात. विस्तृत म्हणजे १२ स्थानांची की त्यातही काही काटछाट किंवा वेगळे पैसे याचा खुलासा त्यांच्या पत्रावरून होत नाही.

नवा पत्ता : **पं. डॉ. रश्मिकांत व्यास,** भारती भवन (महाकाळ), उज्जैन, मध्य प्रदेश, भारत.

**३) श्री. नारायण नंदी शास्त्री :**

जुना पत्ता : House No. 93, Room No. 5, सँन्डहर्स्ट रोड, गोल देवळाजवळ, मुंबई ४.

वरील पत्यावर पाठवलेले पत्र कुरतडलेल्या हिंदी अक्षरात 'इस तरहा का आदमी पिछले दस सालसे गांव चला गया था' असा मजकूर लिहून परत आले. तेव्हा या शास्त्रींचा मुंबईत शोध घेऊ नये. इतर नंदीनाडी शास्त्रींचे पत्ते कदाचित दक्षिण भारतात मिळणे शक्य आहे.

**४) अमृत आनंद भृगू :** जुना पत्ता रेल मंडी, होशियार पूर, पंजाब.

महाराष्ट्र राज्य लेबर कोर्टाचे रिटायर्ड जज्ज व प्रथितयश लेखक श्री. मधुरंजन भोपे यांनी २०-२२ वर्षांपूर्वी या भृगू शास्त्रींकडे आपले भविष्य पाहिले होते. त्याची सविस्तर हकीकत पुढे येईल.

सध्या याच पत्यावर अमृत आनंद भृगूसंहितेचे वाचन करतात. आता त्यांची फी मात्र ५०० रु. झाली आहे. याशिवाय होशियारपूरच्या याच पत्याजवळ आणखी काही जण 'असली' भृगूसंहिता आपणाकडे आहे, असा दावा करून भविष्य सांगतात. त्यांची फीही साधारण तीच असावी.

याच संदर्भात नुकतीच घडलेली घटना अशी, की आमच्या एअर फोर्स स्टेशनमध्ये हजारोंच्या संख्येने एअरमन, सिविलियन काम करतात. देशाच्या कानाकोपऱ्यातून आलेल्यांचा त्यात समावेश असतो. माझ्या कामाचा एक भाग त्यांची प्रवासखर्चाची बिले तपासून पास करणे, पैसे देणे, पगार वाटप असा असल्याने कोण, कुठल्या गावचा वगैरे माहिती आपसूकच कळते. असेच एक वॉरंट ऑफिसर साधूराम आपल्या नातेवाइकांना भेटायला होशियारपूरला निघाले होते. मी त्यांना अमृत आनंद भृगूंना भेटून माझे भविष्य जाणावे, यासाठी जुलै १९९४ मध्ये पत्रिका व पैसे दिले होते.

काही दिवसांनी ते परतले. मला भेटल्यावर हात जोडून म्हणाले, "साहेब, तुम्ही मला कुठे पाठवलेत. माझा फुकट अपमान झाला!"

सविस्तर सांगताना वॉरंट ऑफिसर साधूराम म्हणाले, "तुम्ही दिलेले काम करायचेच म्हणून चंडीगडहून मुद्दाम तेथे गेलो. सकाळी नऊला पोचलो, तर 'दहाला या' असे म्हणून दरवाजा बंद झाला. दहा वाजता रिसेप्शनमध्ये बसा. अमृत आनंदशास्त्री कामानिमित्त घराबाहेर गेले आहेत,' असे एकाने सांगितले.

थोड्याच वेळात एक पांढऱ्या केसवाल्या वयस्क बाई आल्या व तुम्ही आत कसे आलात? आधी बाहेर व्हा,' असा त्यांनी एकदम तारस्वर काढला. श्री. साधूरामजींनी त्यांना मी कामासाठी आलोय. आपल्याच माणसाने या बसा म्हटले' असे समजावणीच्या सुरात सांगण्याचा प्रयत्न केला; पण काही

(पान ३२ पाहा)

# नाडी ग्रंथाच्या पानांची व्याप्ती

सध्या पृथ्वीवर जर ३०० कोटीपेक्षा जास्त जीवित मानव आहेत, असे ठोकळमानाने मानले. शिवाय आजपर्यंत हजारो वर्षांत अगणित मानवांचे असंख्य जन्म-मृत्यू झाले असतील. अशा सर्वांना उपयोगी पडणारे नाडी साहित्य आहे, तरी किती प्रचंड ? याचा आवाका किती ? कधी तरी एक वेळ अशी येईल की या पत्रांचे वाचन संपून गेले असेल व नवीन पत्र्या/ कुंडल्या लिहिण्याची वेळ आली असेल? असे बरेच प्रश्न निर्माण होतात. नाडी ग्रथांची पाने किती असावीत, याचा बऱ्याच विद्वानांनी शोध घेतला आहे. डॉ. बी. व्ही. रामन यांच्याप्रमाणे सरस्वती नाडीत एका बंडलात साधारण ५० या प्रमाणात १००० बंडले होती, म्हणजेच ५० हजार कुंडल्या त्यात मांडून भविष्य सांगितले होते. सत्यसंहितेमध्ये एका बंडलात ३०० कुंडल्या अशी १२५ बंडले होती. म्हणजेच ३७,५०० कुंडल्या त्यात होत. 'नाडीग्रंथ' पुस्तकात नंदीनाडी शास्त्रींनी त्यांच्याकडे १२ लाख कुंडल्यांच्या ताडपत्र्या आहेत, असे सांगितले होते. त्यातच एके ठिकाणी पंडित हवेलीराम यांच्याकडे अरुण संहितेच्या ४०० शेर वजनाच्या ७०० लाखांवर (७ कोटी?) पत्रिकांचा दावा केला आहे. ढवळे प्रकाशनातर्फे निघालेल्या सुबोध भृगुसंहिता या ग्रंथाच्या प्रस्तावनेत ज्योतिषी प्रभाकर नारायण दहिवलेकर यांनी शंकासमाधान केले आहे. त्यात ते म्हणतात, कुंडल्यांचा आवाका २,५६,८०० साधारण दर शंभर वर्षांचा बनेल, अशी कित्येक शतके गेली आहेत. यावरून वाचकांनी कुंडल्यांचा आवाका पाहावा.

प्रस्तुत लेखकानेही आपल्यापरीने याबाबत माहिती मिळवायचा प्रयत्न केला. दोन वर्षांपूर्वी मुंबईतील स्व. बाबूभाईंच्या एका (नाव आता आठवत नाही) मुलाशी याबाबत विचारले असता ४० बैलगाड्यांतून या पट्ट्या त्यांच्या पूर्वजांनी केरळातून आणल्या होत्या. आता एका बैलगाडीत किती पत्र्या बसतील, याचा अंदाज त्यांनी माझ्यावर सोपवला. तो मी वाचकांवर सोपवतो. मद्रासमधील टी नगर या उपनगरात असलेल्या शुकनाडीच्या संचालकाने यावर थोडासा वेगळा प्रकाश टाकला. त्याच्याकडे १०००-१२०० च्या आसपास विविध नाड्यांची बंडले आहेत. त्यात साधारण ५० ते ६० हजार पत्र्या असतात; पण कदाचित आकडा फारच कमी वाटल्याने त्याने तमिळमधून आणखीही बरीच बंडले इतर ठिकाणी ठेवली आहेत, असे सांगून भाषांतर करणाऱ्यातर्फे मला इम्प्रेस करण्याचा प्रयत्न केला. मद्रासमध्येच काही जण २/४ बंडलेच हाताशी राखून भविष्य सांगण्यास सिद्ध झाले आहेत. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे याच बंडलातील व्यक्ती भविष्य पाहायला येणार, हे अपेक्षित आहे. तेव्हा बाकीचे बिंडे इथे कशाला बाळगावेत? पण तुमच्याकडे किती पट्ट्या आहेत? याचे साधे सरळ उत्तर देताना इल्ले स्वामी', डोन्ट नो' म्हणून वेळ मारून नेतात.

असं म्हणता येईल की आपल्याकडील नाडी पट्यांचा आकडा सांगून तो जर ऐकणाऱ्याला इतका धक्कादायक वाटला नाही, तर काय करता असे वाटून ते मोघम उत्तर देतात. कोणीही आतापर्यंत लुंगी वर खोचून, '४ दिवसांनी भेटायला या. मी किती बंडले ते मोजून ठेवतो,' असा पवित्रा घेताना दिसत नाही !

■

नाडी भविष्य ज्यावर लिहिले गेले आहे ते ताडपत्रे असलेले बंडल



# विविध नाडी केंद्रांचे अनुभव

आतापर्यंत विविध नाडी निलायमना (केंद्रांना) भेटी देण्याचा प्रसंग आला. तेथील वातावरण, नाडीवाचकांचे किस्से. तेथे भेटलेल्यांच्या गमती थोडक्यात वर्णन करतो.

**अगस्त्य नाडी निलायम-तांबरम :** आधी स्वतःसाठी मग बायको-मुलांसाठी, नंतर जवळील नातलग-मित्रांसाठी करता-करता या घराजवळच्या नाडीकेंद्रात माझ्या बऱ्याच फेऱ्या झाल्या. आता तेथील लोकांशी एकेरीने नाव घेण्याइतका मी रुळलो आहे. भाषेचा प्रश्‍न प्रचंड. त्यांच्यातील प्रत्येकाला माझ्याशी बोलायची तीव्र इच्छा असते. नाईलाज असतो. मला तमिळ बोलता येत नाही. तसा मी प्रयत्न केला नाही; पण मी तमिळ अक्षरे चटकन वाचू शकतो.

तेथील नाडीवाचकांत श्री. शिव षण्मुगम हा जास्त प्रतिभावान वाटतो. श्री. राजेन्द्रन इंजिनियरिंग डिप्लोमा करून या वाचनाकडे घराण्याच्या परंपरेने वळला. त्यामुळे तो इंग्रजीत लिहू आणि बोलू शकतो. काळाचे (Tense) भान त्याच्या भाषेत कमी. मोजकी, ठराविक शब्दसंपदा असूनही त्याचे इंग्रजीतील भाषांतर समाधानकारक आहे. श्री. राजेंद्रन रेकॉर्डिंग करतो, तर श्री. मीनाक्षी सुंदरम यांचा तमीळ जुने ते तमिळ नवे करून लिहून देण्यात कोणी हात धरणार नाही. ४० पानी वह्यांचे गठ्ठेच्या गठ्ठे तो फस्त करताना दिसतो. एका पोलिस इन्स्पेक्टरने त्याला पेनसेट बक्षीस म्हणून दिला, याचे त्याला फार कौतुक. एक दिवशी त्याला माझ्याशी बोलायचे आहे, हे इतके प्रकर्षाने जाणवले. 'हैलो मिस्टर सुंदरम', म्हणताच जवळजवळ २० मिनिटे तो तमिळमध्ये बोलत होता. तो काय बोलला यापेक्षा त्याला मिळालेले समाधान फार होतें.

असाच एक नाडीवाचक आहे, श्री. नाथन. "स्वामी, इंग्लिश कुंचम कुंचम.' (थोडे थोडे) राजेन्द्रनला मध्ये घालून तो माझ्याशी बोलण्याचा प्रयत्न करे. मी त्याचा संकोच घालवायला म्हणालो, "मला तमिळ कुठे येतेय? बट स्पिकिंग." तू इंग्रजीत बोल मी समजून घेतो! आता अधून-मधून माझ्याशी गप्पा मारतो. माझे भविष्य सांगायची इच्छा त्याला फार. कारण यानेच प्रथमतः ३-४ बंडलानंतर पुन्हा महिन्याभराने म्हणून सांगितले व त्यानंतर माझे भविष्य श्री. शिवष्ण्मुगमने पाहिले. एकांना मी नाडी पाहायला नेले होते. त्या वेळी श्री. नाथनलाच भविष्य पाहायला द्या, असे सांगितले. पुढे नाडीवाचन झाले. नाथन मला 'स्वामी, थँक यू' म्हणाला. खरे तर मी त्याला ते म्हणायला हवे होते !

**'प्लीज वेट' !**

हे दोन शब्द कुठल्याही नाडी केंद्रातील माणसांना सारखे वापरावे लागतात. संगीतकार कल्याणजी (आनंदजी) यांनी सांगितलेल्या जोकप्रमाणे, "५ मिनिटे थांबा. मी तासाभराने येतो!" असा खाक्या सर्वत्र असतो.

'वाट पाहणे' हा इथला स्थायी भाव आहे. भविष्य पाहायला आलेले सर्व जण एकमेकांकडे पाहत वा तमिळ पेपरमध्ये डोके खुपसून बसतात, तर कधी चढ्या आवाजात गप्पा मारतात. मीही खुंटासारखा बसून कंटाळतो, तेव्हा इतरांना बोलते करतो. त्यात त्यांच्या भविष्याचे किस्से कळतात. एक असेच गृहस्थ होते. ओढग्रस्त वाटले. बोलताना कळले, की यांनी १० वर्षांपूर्वी कांचीपुरम येथे भविष्य पाहिले. शांती-दीक्षा करा. पुढे वाईट काळ आहे,' असे सुचवले होते. याने त्याकडे लक्ष न देता तो सोइस्करपणे विसरून गेला. नंतर बरेच वाईट प्रसंग आले. नोकरी गेली. करता करता एके ठिकाणी त्याचा मित्र आपल्या मुलीच्या लग्नासाठी या भविष्याचा पाठपुरावा करत आला. परजातीयाशी मुलीचे प्रेमप्रकरण आहे. तो तिला लग्नानंतर फसवणार नाही ना? वगैरे त्याला प्रश्‍न होते म्हणे. नाडीत तोच तिचा पती असेल, असे आल्यावर लग्न पार पडले. या किश्श्यावरून या महाराजांना जाग आली व पुन्हा आपले भविष्य आजमावयला ते या केंद्रात आले. 'शांती-दीक्षा सांगूनही का केली नाहीस?' असा खडा सवाल केला गेला. अजूनही कर परिस्थिती बदलेल. हे झाल्याला २ महिने होऊन गेले होते. आता तो सांगायला आला होता, की माझ्या परिस्थितीत बराच फरक पडला आहे. त्या भेटीच्या वेळी मी व तो बोलत होतो. एकदा एकाने सांगितले, की मी एका प्रतिष्ठित वकिलांबरोबर आलो होतो. नाडी वाचायला आरंभ झाला.

त्या माणसाचे नाव-गाव निघाले; पण पुढच्या ओळीत अगस्त्यांनी भविष्य सांगायला नकार दिला. 'याला येथून बाहेर काढा' असा उद्धट वाटेल असा आदेशही दिला. बिचाऱ्याला लगेच उठून जावे लागले. अगस्त्य नाडीचा मागील जन्मात त्याने काही कारणाने अपमान केला होता, असे नाडीवाचकाने नंतर सांगितले.

अशीच एकदा 'कीरो' नावाच्या न्यूमरॉलॉजिस्ट संख्या किंवा अंकशास्त्र तज्ज्ञाशी गाठ पडली. तो स्वतः कुंडल्या पाहतो. लोकांना जन्मतारीख, नावाच्या अक्षरांवरून भविष्य सांगतो; त्याच्याआईला दोन महिन्यांपूर्वीपासून छातीत दुखायला लागले. विविध आधुनिक परीक्षा-औषधे झाली. इथे येऊन शांतीदीक्षा कांडमप्रमाणे सोपस्कार करताच एकदम छातीचे दुखणे थांबले; पण आता नवे लचांड उपस्थित झालेय! माझी आई मोठी इन्शुरन्स एजंट आहे; पण २ महिन्यांत १ रुपयाचा धंदा झाला नाही, म्हणून ती नर्व्हस आहे. कितीही समजावले तरी तिचा आत्मविश्वास गेलाय तो परत येत नाही. शांतिदीक्षा करूनही हे असे का, असे विचारायला आलोय. ते म्हणतात, याचे उत्तर आम्ही काय देणार? हवे तर प्रश्नकांडममधून उत्तर मिळवा! 'किरो'चा पत्ता :- CHEIRO, A/13 Vijay, 33 Halls Road, Egmore Madras-, Tel.: 8268192.

इट्टै नाडीवाले श्री. ओमउलगनाथन यांचे नाडीकेंद्र वातानुकूलित आहे! असणारच. कारण त्यांची फी रु. १०००/- वाचल्यावर गिन्हाईकांना घाम फुटणार! ह्या गृहस्थांच्याकडे एक मल्याळी गृहस्थांची भेट झाली. अस्सलिखित इंग्रजी, शुद्ध संस्कृत बोलणारे श्री. रवींद्रन तंत्र-मंत्र करणारे काळ्या विद्येवरचे अधिकारी आहेत. ते म्हणाले, तरुणपणी माझा इतर केरळी तरुणांच्या कम्युनिस्ट विचारधारेप्रमाणे देव-देवता सर्व थोतांड, धर्म व धार्मिक कार्य सगळा दुबळ्या मनाच्या लोकांचा फाजिल अंधविश्वास, असा माझाही ठाम आग्रह होता. नंतर वडील वारल्यावर आईने गळ घातली, की तुझा विश्वास आहे की नाही, हा प्रश्न नसून वडिलांकडे पूर्वापारपणे चालत आलेली ज्ञानगंगा-विद्या तुला शिकली व इतरांना शिकवली पाहिजे. आईच्या शब्दाचा मान ठेवण्यासाठी अभ्यास केला. या मांत्रिकाच्या कामात लुच्चे- लफंगेही असतात व पैसे उकळण्याचेही काम व्यवस्थित केले जाते. माझ्याबाबत असे म्हणता येईल, की जो मार्ग मी धुंडाळतो त्यात कोणाला अज्ञानात ठेवत नाही. पैसे योग्य तेवढेच आकारतो. तरीही नक्की किती. असे विचारता फुकट ते लाख भर असा आकडा त्यांनी सांगितला. बोलता बोलता मला त्यांनी "तुम्ही १ ते ९ पर्यंत कुठलाही आकडा मनात धरा."

### इंग्रजी सन मराठी संवत्सर- तमिळ वरुषम् नावे

| इंग्रजी- सन | शके- | मराठी संवत्सर नाव | तमिळ वरुषम नाव |
|---|---|---|---|
| १९९४- १९९५ | | | |
| १९३४- ३५ | १८५६ | भाव | भव |
| १९३५- ३६ | १८५७ | युव | युव |
| १९३६- ३७ | १८५८ | धातृ | तादू |
| १९३७- ३८ | १८५९ | ईश्वर | ईश्वर |
| १९३८- ३९ | १८६० | बहुधान्य | विहुधानिया |
| १९३९- ४० | १८६१ | प्रमाथी | ब्रह्मादि |
| १९४०- ४१ | १८६२ | विक्रम | विक्रम |
| १९४१- ४२ | १८६३ | वृष | विशु |
| १९४२- ४३ | १८६४ | चित्रभानु | चित्तभानु |
| १९४३- ४४ | १८६५ | सुभानु | सुभानु |
| १९४४- ४५ | १८६६ | तारण | तारण |
| १९४५- ४६ | १८६७ | पार्थिव | पार्थिव |
| १९४६- ४७ | १८६८ | व्यय | वीय |
| १९४७- ४८ | १८६९ | सर्वजित | सर्वसित्तु |
| १९४८- ४९ | १८७० | सर्वधारी | सर्वदारी |

### इंग्रजी सन मराठी शक- संवत्सराची तमिळ नावे

| इंग्रजी- सन | शके- | मराठी संवत्सर नाव | तमिळ वरुषम नाव |
|---|---|---|---|
| १९४९- ५० | १८७१ | विरोधी | विरोधी |
| १९५०- ५१ | १८७२ | विकृती | विकृती |
| १९५१- ५२ | १८७३ | खर | कर |
| १९५२- ५३ | १८७४ | नंदन | नंदन |
| १९५३- ५४ | १८७५ | विजय | विजय |
| १९५४ – ५५ | १८७६ | जय | जय |
| १९५५ – ५६ | १८७७ | मन्मथ | मन्मथ |
| १९५६ – ५७ | १८७८ | दुर्मुख | दुन्मुखी |
| १९५७ – ५८ | १८७९ | हेमलंबी | हेविलंबी |
| १९५८ – ५९ | १८८० | विलंबी | विलंबी |
| १९५९ – ६० | १८८१ | विकारी | विकारी |
| १९६० – ६१ | १८८२ | शार्वरी | सार्वरी |
| १९६१ – ६२ | १८८३ | प्लव | विलव |
| १९६२ – ६३ | १८८४ | शुभकृत | शुभकीर्तु |
| १९६३ – ६४ | १८८५ | शोभन | सोभकीर्तु |

मी म्हटले, 'धरला.' "आता तुमच्या नावाची अक्षरे मोजा, त्यात अमूक करा, तमूक करा, म्हणत शेवटी दोन्ही हाताच्या मुठी उघडून दाखवत म्हणाला," पाहा, पहिला मनात धरलेला हा तर नाही ?'' दुसरा तळहात दाखवत म्हणाला, दुसरा आकडा हा तर नाही ?'' एकावर इंग्रजीत ९ व दुसऱ्यावर ७ असा बरोबर आकडा होता !

तुम्ही या इरट्टै नाडी केंद्रात काय करता ? या प्रश्नाला त्याने उत्तर दिले, की बऱ्याच वेळा नाडीत अघोरी वा काळ्या विद्येचे काही उपचार सांगितले, तर नाडीवाचक मला बोलवून ते करून घेतात. मी पत्ता टिपून द्या, म्हणताच त्यांनी पत्ता दिला तो असा : **महाकाली उपासकर, मलयाला मांत्रिक-तांत्रिक व ज्योतिषी, श्री. के. रवींद्रन, No. 50, A.V.M. Avenue, 1st Main Road, Virugambakkam, Madras-92.**

पुढे गप्पांच्या संदर्भात भारत देशाचे भवितव्य, तिसरे महायुद्ध, नॉस्ट्रॅडॅमसची भविष्यवाणी, आपल्याकडील नाडी-कर्ते, यांवर बरीच चर्चा रंगली. बोलताना ते म्हणाले, भारत' या शब्दाचा अर्थ काय माहीत आहे ?'' मी नकारार्थी मान हालवली (मी तसे नेहमीच करतो. कारण समजा' हो म्हणालो, तर सांगणाऱ्याचा विरस होतो.) भासि सर्वेषु वेदेषु, रति सर्वेषु जंतुषु, तारणाम सर्व भूतानाम् तस्मात भारतमुच्यते !' (वेद विद्येचा जेथे आवडीने अभ्यास होतो. सर्व प्राण्यांना तिथे राहण्यात गोडी वाटते, सर्व प्राणिमात्रांचे रक्षण केले जाते, त्याला भारत म्हणतात, असा साधारण अर्थ !)

तळहातावर मी मनात धरलेले आकडे कसे अवतरले ? ते कोणी, केव्हा लिहिले ? मला बोलण्यात गुंतवून त्याने तळहातावर आधीच आकडे लिहिले, असे मानले तरी मी मनात केलेल्या गणिताचे उत्तरही तेच कसे आले, या प्रश्नांनी मी त्यांना छेडले, तेव्हा पुन्हा भेटलात, की मी तुम्हाला शिकवेन, असे म्हणून मला गप्प केले ! मी त्यांना भेटण्यासाठी इरट्टैनाडी केंद्रात गेलो, तर तेव्हा भेटीचा योग नव्हता !

आता कालचीच (दि. १५ ऑगस्ट १९९४) गोष्ट. तांबरम नाडी केंद्रात जपानी लोक नाडी पाहायला आले होते. बरोबर एक मिस. सुजाता नामक तमिळ भाषांतर करणारीही होती. तिच्यातर्फे त्या जपानी माणसांशी बोलण्याचा प्रयत्न केला. नाडी ग्रंथात त्यांची माहिती बरोबर

### इंग्रजी सन मराठी शक- संवत्सराची तमिळ नावे

| इंग्रजी- सन | शके- | मराठी संवत्सर नाव | तमिळ वरुषम नाव |
|---|---|---|---|
| १९६४ – ६५ | १८८६ | क्रोधी | क्रोधी |
| १९६५ – ६६ | १८८७ | विश्वावसु | विस्वावसु |
| १९६६ – ६७ | १८८८ | पराभव | पराभव |
| १९६७ – ६८ | १८८९ | प्लवंग | पिलवंग |
| १९६८ – ६९ | १८९० | कीलक | कोलह |
| १९६९ – ७० | १८९१ | सौम्य | सौम्य |
| १९७० – ७१ | १८९२ | साधारण | साधारण |
| १९७१ – ७२ | १८९३ | विरोधकृत | विरोधीकिस्तु |
| १९७२ – ७३ | १८९४ | परिधावी | परितापी |
| १९७३ – ७४ | १८९५ | प्रमादी | ब्रह्माधीश |
| १९७४ – ७५ | १८९६ | आनंद | आनंद |
| १९७५ – ७६ | १८९७ | राक्षस | राक्षस |
| १९७६ – ७७ | १८९८ | अनल | नळ |
| १९७७ – ७८ | १८९९ | पिंगल | पिंगळ |
| १९७८ – ७९ | १९०० | कालयुक्त | कालयुक्त |

### इंग्रजी सन मराठी संवत्सराची- तमिळ वरुषम्

| इंग्रजी- सन | शके- | मराठी संवत्सर नाव | तमिळ वरुषम नाव |
|---|---|---|---|
| १९७९ – ८० | १९०१ | सिद्धार्थी | सिद्धार्थी |
| १९८० – ८१ | १९०२ | रौद्र | रौद्री |
| १९८१ – ८२ | १९०३ | दुर्मति | दुंतुमती |
| १९८२ – ८३ | १९०४ | दुंदुभि | दुंदुंभी |
| १९८३ – ८४ | १९०५ | रुधिरोद्गारी | रौत्कारी |
| १९८४ – ८५ | १९०६ | रक्ताक्षी | रक्ताक्षी |
| १९८५ – ८६ | १९०७ | क्रोधन | क्रोधन |
| १९८६ – ८७ | १९०८ | क्षय | अक्षय |
| १९८७ – ८८ | १९०९ | प्रभव | प्रभव |
| १९८८ – ८९ | १९१० | विभव | विभव |
| १९८९ – ९० | १९११ | शुक्ल | शुकिल |
| १९९० – ९१ | १९१२ | प्रमोद | प्रमादुत |
| १९९१ – ९२ | १९१३ | प्रजापति | प्रजुरपती |
| १९९२ – ९३ | १९१४ | अंगिरा | अंगिरस |
| १९९३ – ९४ | १९१५ | श्रीमुख | श्रीमुख |

आली काय? यावर त्यांचे 'हो' उत्तर होते. काय नावे आली? याचे उत्तर एकाचे नाव- के. सुके मात्सुशिटा, दुसऱ्याचे- जोबुओ उए मास्तु. तिसऱ्या बाईचे- तो मे ऊ इवाजावा, असे मिस सुजाताने सांगितले. तमिळ भाषेतील लिखाण, तमिळांचे उच्चार, जपानी उच्चार यांतील जिव्हा दोष वगळता नावे तंतोतंत बरोबर आहेत, असे जपान्यांचे मत पडले. 'जपान' देशाचे नाव नाडीत कसे आले? यावर मिस सुजाता म्हणाली, "विदेशी' असा मोघम उल्लेख आहे." धर्माचे नाव काय आले? "काहीच नाही. आम्ही कुठलाच धर्म मानत नाही," असे एका मिचमिच्या डोळ्यांच्या माणसाने तिला मला सांगायला सांगितले. हेही धर्माचे नाव न येण्याचे कारण असेल! या लोकांना नाडी पाहायला यावे, अशी कशी प्रेरणा झाली? याचे उत्तर आले, की श्री. "दीपक आओयामा' या जपानी माणसाने जपानी भाषेत सत्यसाईबाबांवर पुस्तक लिहिले आहे. त्यात भारतात अंगठ्याच्या छापावरून भविष्य ताडपट्ट्यामधून सांगतात, असा उल्लेख होता, त्याअनुसार आम्ही आलो! जपानमध्ये या किंवा वेगळ्या तऱ्हेचा भविष्य सांगण्याचा प्रकार आहे का? याचे उत्तर आमच्या पाहण्यात नाही. मात्र चीनमध्ये इचिंग' किंवा आयचिंग' या नावाची भविष्य सांगण्याची पद्धत आहे. त्यावर एक इंग्रजी पुस्तकही बाजारात आहे. बांबूच्या पानांवर लिहिलेले भविष्य पाहणारी व्यक्ती आपल्या हाताने आपसूक जे हाताला लागेल ते उचलून पाहते, ते नेमके त्याच व्यक्तीचे भविष्य असते, असे मिस सुजाताने थोडक्यात सांगितले. या जपानी व्यक्तींच्या बाबत असे काही प्रसंग, बाबी सांगता येतील का, की त्या ऐकून त्यांनाही धक्का बसला! त्यांच्या त्यांच्यात बरीच बोलाचाल झाल्यावर उत्तर आले, 'तो' बाईचे वडील घटस्फोटीत आहेत, तर 'जो बुओ'च्या बायकोला अस्थमा आहे.. या गोष्टी प्रकर्षाने वेगळ्या; पण खऱ्या वाटल्या!

**श्री. नटराजन शर्मा-** तांबरमच्या नाडी केंद्रात असाच एकदा 'प्लीज वेट' करत असताना एकाने श्री. नटराजन शर्माजींचा पत्ता अंदाजाने दिला. आसामी जरा विक्षिप्त आहे, असा इशाराही दिला. एके दिवशी आईस हाऊस, ट्रिप्लीकेन करत रिक्षाने गेलो. नक्की पत्ता नसल्याने घर सापडेना. तासाभराच्या फिरण्यानंतर रिक्षावाल्याला तडक पोस्ट ऑफिस गाठायला सांगितले! तेथे नेमके पोस्टमन बटवडा करायला बाहेर पडलेले! एक बरे होते, माझ्यापेक्षाही त्या रिक्षावाल्याने घर हुडकण्याचा चंग बांधला होता. तोच माझ्याजवळचा पत्ता घेऊन तमिळमध्ये दिसेल त्याला विचारत होता. समुद्र किनाऱ्यालगतची दमट हवा, दुपारची वेळ, घामाची चिकचिक, मीटरचे चक्र वाढते बिल दाखवते आहे. अशा परिस्थितीतही मी शोधायचे थांबायला तयार नव्हतो. रिक्षावाल्याला तू आईस हाऊसपाशी सोड! मी पाहतो काय करायचे, असे म्हणेपर्यंत एक पोस्टमन सायकलवरून जाताना दिसला. त्याला विचारताच, 'हात्त तेच्या, नटराजन शर्मा- ज्योतिषी ना? या पुढच्या चौकात वळा व थोडेसे गेले की येईल,' असे सांगता झाला. घरापाशी सोडल्यावर ५५ रु भाडे व वर ५ रुपये देताना रिक्षावाल्याचे कष्ट या पैशापेक्षा खूप जास्त होते, हे जाणवत होते.

नटराजन शर्मांचे घर जुनाट. भविष्य सांगायची खोली म्हणजे फाटक्या वह्या, जुनाट रजिस्टरे, पिवळट पडलेल्या पानांच्या पुस्तकांचे अस्ताव्यस्त संमेलन होते. कोळिष्टकांना आपल्या जाळ्यांची कल्पक रचना करण्यास भरपूर उदारपणे वाव देणाऱ्या खोलीत, पेढीवरच्या लाकडी पेटीसमोर बसून नाडीशास्त्री मांडी घालून उरलेली जागा इतकी कमी असते, की भविष्य ऐकायला येणाऱ्या गिऱ्हाईकाची मांडी कशी-बशी बसेल.

गृहस्थ ६५ च्या पुढे. पानांचा तोबरा, रंगीत दात, पांढऱ्या दाढीचे खुंट, केस कधीही कंगव्याचे दर्शन न घेतल्याप्रमाणे, अर्धे शरीर तमिळी खाक्याप्रमाणे उघडे!

मी युनिफार्ममध्ये होतो. शूज काढता काढता आतल्या खोलीकडे व चाललेल्या संभाषणाकडे लक्ष देऊन होतो. बोलण्याची पद्धत थोडीशी तिरकस आहे असा अंदाज आला. अशा व्यक्तीला आपलेसे केले नाही तर इथे थारा नाही हे जाणून मी युक्ती करायचे ठरवले. मला आत बोलाविल्यावर मी तडक पायावर साष्टांग नमस्कार घातला. 'शुभम् भवतु' असा आशिर्वाद मिळवला व मगच बसता झालो. परिचय दिला. शर्माजींनी त्यांच्या उच्चारात विचारले, "व्हाऽऽट इज योर गोतरा' (तुझे गोत्र काय?) - 'वसिष्ठ' मी उत्तरलो. 'गुड, यू आर फ्राम माय गोतरा' (तू सगोत्र आहेस) आय हॅव ना टाईम कम आफ्टर फोर डेज. (मला वेळ नाही ४ दिवसांनी या) पण मग मी मराठी आहे. कोकणस्थ वगैरे का विचारल्यावर पत्रिका दाखव म्हणून आदेश मिळाला. १९४९ सालचे पंचांग हाताशी न येण्या इतपत दूर होते. मी पटकन उठून पुस्तकांची उठाठेव केली व पंचांग हाती दिले. "आई डोंट बिलिव इन ब्लिनली नेस" असे हसत स्वतःला सर्टिफिकेट घेत, माझ्या पत्रिकेत मंगळ आहे. तू आणलेली पत्रिका चूक आहे असा शेरा मारला! मधेच एकदम 'डू यू नो पार्डी?' (पार्डी माहिती आहे का?) असा टेढा सवाल टाकला. मला माहीत नाही असा चेहरा मी करेन मग व्हाऽऽट सार्ट आफ महाराष्ट्रीयन ब्राह्मीन आर यू असे हेटाळणी करणारे वाक्य त्यांच्या तोंडात पानाप्रमाणे घोळत असावे. पण मी "हो' पंडित सातवळेकर जेथून वेद-उपनिषदांवर पुस्तके लिहित व प्रकाशित करीत ते गाव" असे सांगताच उत्तर मिळाले म्हणून नाराजी पण सगोत्र असल्याचा आनंद त्यांच्या चेहऱ्यावर वाटला! "पंडित सातवळेकरांचा फोटो प्रत्येका घरी पूजेच्या जागेत असायला हवा इतका तो माणूस महान आहे." अशी त्यांची

भलावण झाली. नंतर बऱ्याच वेळ फोनवरून आजारी आहे नंतर फोन करा असे करत महिना २ महिने गेले. शेवटी आज येतोच आता धीर धरवत नाही म्हणताच "यू आर ए पिक्यूलियर फेलो" असे म्हणत त्यांनी फ़ोन पटकला. भेटलो तेव्हा म्हणालो की मी आहेच जरा विचित्र. त्यादिवशी माझे ताडपत्र पाहिले काही प्रश्न विचारताच, 'यू आर फ्राम टॉप टू बॉटम फुल्ल आफ क्वश्चन्स" असा उत्तर पत्रिकेवर लाल शाईत पडतो तसा शेरा बसला.

श्री नटराजन शर्माजींकडे पराशर नाडी आहे. ती आहे संस्कृतमध्ये पण पट्टीवर कुठल्या लिपित असावी हे पहायला हाताळायला मागितली तर "व्हॉट फॉर?" असा सवाल करून त्यांनी मला गप्प केले! मी टेप व वही काही लिहून देणार का? असे विचारताच, "आई अॅम नॉट लाईक दोज रोग्ज (त्या इतर नाडी वाचकासारखा मी हलकट नाही) असा शेलका आहेर केला. हवे तर पेन देईन पण कागद तुम्ही आणायचा इतकी टोकाची भूमिका. या नाडीत नाव, गाव याचे उल्लेख का नाहीत असे विचारले तर माझी नाडी 'असली' इतरांची बोगस. हवी तर पहा नाहीतर उठा. चालू लागा. आपण किती फी घेता? याचे उत्तर त्यांनी शेवटपर्यंत टाळले. मी १०० रु. देताच मात्र न कुरकुरता घेतले.

त्यांच्याकडे पाहिले, बोलले की पु.ल. नी उभा केलेला अंतू बर्वा हे व्यक्ती चित्र डोळ्यासमोर तरळते.

**श्री मोहन सुंदरम :** अगतियार नाडीचे वाचक 'न्यू बंगलो स्ट्रीट" वर राहातात. रस्त्याच्या नावावरून टुमदार बंगल्यांची रांग असेल असे वाटले. प्रत्यक्षात बोळकांडी वजा रस्ता शोधता शोधता नाकीनऊ आले. जुनाट घर. त्यात एका छोट्या खोलीत हे गृहस्थ एकटेच नाडी वाचन करतात. दर रविवारच्या हिंदूमध्ये त्यांची छोटी जाहिरात येते. मी पोचलो तर आत कोणीतरी होते. म्हणून दरवाज्यापाशीच थबकलो. रस्त्यावर २ जण मोटर सायकलपाशी उभे होते यांनी दरवाजा ठोठवा असा इशारा केला पण सभ्यता आड येऊन मी चूप उभा राहिलो. ते दोनजण माझ्यापाशी आले. एकाला इंग्रजी येत होते. नाडीशास्त्रींना इंग्रजी येत नाही. अगस्त्य नाडीप्रमाणे नाव या नाडीत येत नाही. खर्च १०० रु. अशी जुजबी माहिती मिळेपर्यंत दरवाजा उघडला गेला. नेहमीप्रमाणे "उद्या या" असे सांगितले गेले. "मी दूरून आलोय पत्रिका आहे. आत्ताच पहा", असा आग्रह धरल्यावर इंग्रजी माणसाने तडजोड करून "पहा त्यांचे (माझे) भविष्य" असा सल्ला दिला. माझ्या पत्रिकेवरून सुंदरमजींनी ५/७ पाने, पत्त्यातील पाने सीक्वेन्स लावायला पुढे मागे करावीत असे करत नाडी वाचायला आरंभ केला! पेन-कागद घेऊन मी सरसावलो ५/७ मिनिटांत नाडी वाचन संपले! काढा १०० रु. असा आदेश आला. नाडीत माझे नाव नव्हते पण झालेल्या वर्णनातून माझ्या डोक्यावर फिट बसेल अशी माहितीची टोपी होती यात शंका नव्हती. मी खिशात हात घातला तर नेमके माझ्याकडे ६०/७० रुपये निघाले श्री सुंदरमजींनी अक्षरशः माझ्या हातून काढून घेत त्यांच्या टेबलातील खणात टाकले व ड्रॉवर बंद केला! माझ्याजवळ परतीचे पैसे नाही म्हटल्यावर १० रु. माझ्या हातावर टिकवले व मला उरलेल्या पैशाची आठवणीने मनिऑर्डर करा असे बजावले. शास्त्रीजींच्या लालचीपणाला व तुटपुंज्या भविष्याला वैतागलो. भविष्यात सांगितले तसे १ लाख सुवर्ण मोहरा मिळाल्या तर तुम्हाला ४० रु. ची म. ऑ. करीन असे मनाशी ठरवत बाहेर पडलो!

## "प्लीज वेट ११ तास" !

"प्लीज वेट" संदर्भात आणखी एक किस्सा असा की टी (त्यागराज) नगरमधील शुगर नाडी (साखरेशी काही संबंध नाही, शुक्र नाडी पण वेगळी या नाडीचे संस्कृत प्रचुर नाव शुक्र नाडी) केंद्रात गेलो. विचार केला मखलाशीने बोलावे नाहीतर "पुन्हा या नंतर पाहू" असे म्हणून टोलावतील!

"कमिंग- फ्रॉम बॉम्बे- एअर फोर्स-नो टाईम असे सांगून सकाळी ८॥ वाजता चंचू प्रवेश केला. नंतर अंगठा छाप देऊन जनरल कांडम सापडून ते वाचेपर्यंत २-२॥ झाले. 'वेट' कर असताना एकानी ज्ञान कांडम- पहा असा सल्ला दिला. ते हुडकण्यासाठी नाडी वाचक गायब (!) संध्याकाळचे ५ वाजून गेले होते. तेव्हा एकदम २ तमिळ बायका तावातावने बोलू लागल्या पैकी एक मॉडर्न वेषात होती तिने इंग्रजीत नाडी वाचकांना फैलावर घेतले, "मी इथे ३ तास बसली आहे. मला "प्लीज वेट" करत ताटकळत ठेवायचे होते तर दुपारी २ ची अपॉइंटमेंट दिली का? आमच्या वेळेला काही किंमत?" अमेरिकन बँकेचे कामाचे तास संपवून या बायका फावल्या वेळात आल्या होत्या. बिचारे दाढी थोडी उगवलेले तरुण नाडी वाचक भांबाऊन गेले. तेव्हा मला तोंड उघडावे लागले. "तुम्ही आत्ता २ वाजता आला आहात. मी सकाळी ८॥ पासून बसलोय या खोलीत! चहा नाही की पाणी नाही. जेवणा वगैरेची शुद्धही मला नाही. आधी आले त्यांचे काम संपल्याशिवाय ते दुसरे काम हाती घेत नाहीत. भविष्य पहायचे असेल तर त्यांच्या कलाने घेतले पाहिजे नाहीतर फुटा इथून." बायका थांबून राहिल्या. त्यांच्या पट्ट्या नंतर सापडल्या. नंतर माझे भविष्यही त्यांनी वाचलं!

लोकलमधून परत येत असताना घड्याळाकडे लक्ष गेलं. रात्रीचे ९ वाजायला आले होते! मी त्या नाडी केंद्राच्या खोलीत १०॥ तास होतो! बायकांशी भांडल्यावर मला नाडी वाचकांतर्फे कॉफी व बिस्किटे मागवली गेली होती. पण ज्ञानकांडातील "विश्वास वाटणार नाही" असे भविष्य वाचून मी पार थरारून गेलो होतो. भविष्यकाळात आपण कसे असू?

त्यासाठी आत्तापासून आपणास काय करावे लागेल यासारख्या विचारांची गर्दी होती!

**रमणी शास्त्रीजी व काक भुजंदर (भृशुंडी) नाडी** विविध नाडी ग्रंथ आणखी कुठे कुठे वाचायला मिळतील याचा शोध चालू असता आमच्या घरापासून फक्त २ कि.मी. दूर पण अगस्त्य नाडी केंद्राच्या
विरुद्ध दिशेला आणखी एका नाडी केंद्राची ओळख झाली. एअर फोर्सच्या कॅम्पसजवळ ही दोन्ही केंद्रे असूनही कॅम्पमधील फारच थोड्या लोकांना या नाडी भविष्याची माहिती आहे असे आढळले. नाडी भविष्य व त्याची चर्चा फक्त आपल्या कुटुंबियातच करावी असाही एक संकेत वाटला! मी मात्र जो भेटेल त्याच्याशी 'नाडी' वर घसरत होतो. पार्टीजमध्ये "काय सर, कुठली कांडे वाचली? काही नवीन धक्कादायक वगैरे?" मित्र चेष्टेच्या स्वरात विचारत. माझ्या सांगण्यावरून माझ्या ऑफिसमधला सहचारी स्क्वाड्रन लीडर गोविंदराजन माझ्या आधी शांती दीक्षा करून पोस्टींगवर गेला! त्याला नोकरी सोडायची आहे. पण भविष्य वेगळे सांगत होते! मुल नाही या व्यथेचाही त्याला पाठपुरावा करायचा होता. त्याला संतती योग सांगितला आहे. काय होते ते पहायचे!

ऑफिसमधील सुटीवर जाणाऱ्या लोकांना देशातील विविध नाडी केंद्रांना भेटी देण्यासाठी पिटाळले. मी थिऑसॉफिकल सोसायटीच्या लायब्ररीचा मेंबर झालो. वगैरे वगैरे! तर रमणीशास्त्रींच्या आश्रम टाईप केंद्राचा असाच गप्पातून शोध लागला व एका शुक्रवारच्या संध्याकाळी तेथे पोचलो. पाऊस, चिखल, कपडे भिजलेले. त्यात मी गेम्सच्या हाफ पँटमध्ये असा अवतार होता. एका मध्यम आकाराच्या हॉलमध्ये अर्ध्या बाजूला विविध देव देवतांच्या लहान मोठ्या तसबिरी, विविध मूर्ती प्राधान्याने शिव पार्वतीच्या तऱ्हेने एका मुनींची! त्या सर्वांवर सुगंधी मोगऱ्याच्या फुला माळांची पखरण उदबत्त्याचा सुगंध प्रसन्न वातावरण यामध्ये रमणीशास्त्री हातात ताडपत्र्यांच्या पानावरील काव्याचे वाचन करत होते. माईकवरून खणखणीत आवाजाला गोडवा होता. काळजाला भिडेल असा स्वर होता. दाक्षिणात्य गायकीच्या आलापातही वेगळा बाज होता. गायनात शास्त्रीजी खूपच तल्लीन झाले होते. जवळजवळ २५ मिनिटांनी गायन झाल्यावर नाडीच्या पट्ट्या गुंडाळून ठेवल्यानंतर एकानी थोडेसे तमिळमध्ये भाषण करून आरती झाली. मग आलेल्या (तोपर्यंत स्त्रिया पुरुष मिळून ६०/७० जण असावेत) भाविकांना प्रसाद म्हणून दहीभात, १/२ तमिळ पदार्थ केळीच्या पानावर वाढले गेले. १५ मिनिटांत प्रसाद संपवून केळीच्या पानांची विल्हेवाट लावून सर्वजण पुन्हा तेथेच सतरंजीवर स्थानापन्न झाले. आता शास्त्रीजींना भेटायला एक एक जण जात होते. प्रत्येक जण त्यांना लवून नमस्कार करून आपले काम सांगे. त्यानंतर शास्त्रीजी कवड्या हातात घेऊन समोरील पटाप्रमाणे ठेवलेल्या जागेत दान टाकत व त्या कवड्यांच्या दानांच्या संदर्भाने थोडेसे एक टक कुठंतरी पहात त्या कामाच्या संदर्भात उत्तर- उपाय सांगत. शास्त्रीजींनी मला बोलावले, तेव्हा मी नमून म्हटले, प्रथम आलोय, तमिळ येत नाही. आशिर्वाद द्यावा. स्वतःबाबत काही विचारायचे नाही. कुंकवाची पुडी देत मला एक हिंदीतील पुस्तिका देत. "काक भृशुंडीच्या भविष्याबाबत विचारायचे असेल तर सवडीने भेटा." शास्त्रीजींनी सल्ला दिला. निरोप घेऊन उठलो. वाटेत एकाला शास्त्रीजींबद्दल माहिती विचारली. त्यानी सांगितले शास्त्रीजींकडे काक भृशुंडी नाडी आहे. जी इथे विविध चित्रे आहेत ती काक भृशुंडी व त्यांची शिष्याबहुला यांचे आहे. साधारण ६ ते ६॥ सकाळ- संध्याकाळ शास्त्रीजी कवड्यांचे दान टाकून त्या अनुरोधाने नाडीतील पान काढून गायन करतात व नंतर भेटायला आलेल्या लोकांच्या कामास उत्तरे किंवा मार्ग सुचवतात. इतर नाड्याप्रमाणे पत्रे काढून भविष्य सांगत नाहीत. या नाडीचे वैशिष्ट्ये असे की ही जीव नाडी आहे. वाचकाच्या मुखातून ते "ऋषीच" बोलतात असा विश्वास सर्वांना वाटतो. भेटणाऱ्यांत बरेच डॉ. सर्जन गुंतागुंतीच्या केसेसमध्ये अडकले तर मार्गदर्शनाला येतात तर काही वकील व इंजिनिअरही आपल्या धंद्यातील सूक्ष्म व विशेष माहिती मिळवून जातात." शास्त्रीजींचा तसा अभ्यास सर्व विषयात नाही. पण त्यांनी सांगितलेले ज्ञान सर्वांना समाधान देते. "यासाठी शास्त्रीजी काहीही पैसे घेत नाहीत. सर्व मुफ्त-फुकट!"

मी परतत होतो तेव्हा एका ५ फुटी पेंटींगने माझे मन खूप वेधले होते. घरापासून २ कि.मी. व स्टेशनपासून ५/६ कि.मी. दूर सेलायूर भागाकडे भारती इंजिनियरिंग कॉलेजच्या समोरील कॉलनीत आड जागी तरीही कार्स, टेम्पो, स्कूटरची गर्दी असते! याचे आश्चर्य वाटले!

रमणी शास्त्रींच्या आश्रम केंद्राला भेट दिल्यावर पुन्हा जाण्याची ओढ लागली. तेवढ्यात पत्नीस भावाच्या भविष्याबाबत विवंचना वाढली. माझे चुलत काका सुप्रसिद्ध इतिहास तज्ञ श्री. पु. ना. ओक यांनी एका जोशी कुटुंबियांच्या प्रापंचिक अडचणीस नाडी भविष्यातून काही तोडगा निघतो का ते पहा असे सुचवले होते. नाडी केंद्र तांबरममध्ये पाय ठेवायलाही जागा नाही. आधी दिलेल्यांचे काही अंगठ्यांचे काम पडून होते त्यामुळे २/३ महिने भविष्य पहाणे अशक्य होते. याच वेळी नेमके रमणी शास्त्रींच्या मोफत भविष्याची आठवण झाली. व मी पत्नीस बरोबर घेऊन एका संध्याकाळी तेथे पोचलो. शास्त्रीजींच्या नाडी गायनानंतर आमचा नंबर आला तेव्हा माझ्या आधीच्या भेटीची आठवण त्यांना दिली. विचारताना नेमके काय विचारायचे याचे भान सुटल्याने प्रश्न अनुत्तरित राहातो

असे न व्हावे म्हणून मी पत्नीस तिच्या भावाबद्दल व श्री. जोशी यांच्या एका प्रश्नास एका कागदावर लिहून त्यांच्या पुढे ठेवले.

नेहमीप्रमाणे शास्त्रीजींनी कवड्यांचा डाव टाकला व शून्य नजर करून जवळ असलेल्या रायटिंग पॅडवर पेनने उत्तर देण्यास सुरवात केली. ते दोन्ही कागद नंतर त्या त्या लोकांना समाधानासाठी पाठवले. तिथेच एअर फोर्समधील एक वयस्क ऑफिसर व त्याची बायको यांची भेट झाली. त्यांनी असे सांगितले की, गेल्या वर्षी मी कुटुंबासह पोस्टींगवर आलो. त्यांची मुलगी केंद्रीय विद्यालयातील आठवीत शिकत होती. ती एक दिवस शाळेतून परतलीच नाही! खूप शोधली. पोलिसात कळवले. एकानी शास्त्रीजींच्या भेटीचा सल्ला दिला म्हणून तेथे गेलो. शास्त्रींनी वर्तवले की मुलगी सुखरूप आहे. उत्तरेस आपण जिथून आलात त्या गावी शोध घ्यावा. तसे शोधता मुलगी खरोखरच आधीच्या गावी हरियाणात होती! कारण काय तर म्हणे शाळेतील मैत्रिणी व इतर वातावरण तिला नावडते झाले. इतके की घरीही तिचे मन लागेना. म्हणून रूसून एकटी ट्रेनमध्ये बसून दिल्ली व नंतर पुढे गेली!

रमणी शास्त्रींच्या संदर्भातील वर उल्लेख केलेल्या व्यक्ती व त्यांचे प्रश्न याबाबत इतरास सांगावे अशी संमती अजून न मिळाल्याने मोघम उल्लेख केला आहे. हे वाचकांनी समजून घ्यावे.

रमणी शास्त्रींशी विविध विषयावर चर्चा करावी नाडी भविष्य किती वर्षे जुने? काक भुजंदर नाडीचे वैशिष्ठ्य काय? भारताच्या बाबत नाडी ग्रंथात काही माहिती मिळेल का? नॉस्ट्रॅडॅमसच्या भाकिताप्रमाणे ३ रे महायुद्ध अटळ आहे का? मानवतेचा संहार व आपापसातील वैर भावना यांना आवर घातला येणे शक्य आहे का? भारताने अंगिकारलेल्या अहिंसा तत्वज्ञानाचा इतर भारत विरोधी देशांवर केव्हा व कसा प्रभाव पडेल? वगैरे सार्वजनिक कुतुहलाचे व मानवतेशी निगडीत प्रश्नांचे काही उत्तर/ भविष्य कळण्यासाठी त्यांच्या भेटीसाठी सज्ज आहे. कारण रमणी शास्त्रीजी त्यांच्या चाहत्यांच्या विनंतीवरून जर्मनी व इतर युरोपियन देशांच्या दौऱ्यावर गेले आहेत.

मीनाक्षी नाडीचे वाचक प्रोफेसर ए. एन. के. स्वामी सध्या अमेरिकेच्या दौऱ्यावर गेलेत यांच्याशी व इरटै नाडीचे वाचक डॉ. ओम उलगनाथन यांशी भेटीचा योग अद्याप आलेला नाही. कोन्नेमरा पब्लिक लायब्ररी मद्रास, तंजावरच्या सरफोजी महाराजांनी स्थापलेली सरस्वती महाल लायब्ररी, वैदीश्वरन कोईल या गावातील विविध नाडीकर्त्यांच्या मुख्यालयांनी भेटी देण्याचे अजून राहिलेले आहे. ■

## नाडी ग्रंथ– इतिहास / (पान १० वरून)

बांधणीची पद्धत काय याबाबत चर्चा झाली. श्री. राव मीना (मीनाक्षी?) नाडीचे वाचक होते. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे बुधनाडीत याबाबत उल्लेख असल्याचे बुध नाडी शास्त्री श्री. निवास आचार्य यांनी त्यांना सांगितले. ते म्हणाले की, काही नाड्या विशिष्ठ काळासाठीच असतात. त्यानंतर त्या आपोआप लुप्त होतात. तर काही योग्य लोकांच्या हाती येताच. त्यातील भविष्याच्या प्रभावाने तळपून लोकमान्य होतात. उदाहरणार्थ- नंदी वाक्यम्, सप्तर्षी वाक्यम, या नाड्या आता भविष्य सांगण्यास असमर्थ आहेत. (म्हणूनच कदाचित मद्रास गव्हर्नमेंट ओरिएन्टल मॅन्युस्क्रीप्ट लायब्ररीत उत्सुक वाचकाला हाताळायला मिळतात.)

श्री. कन्नन व डॉ. बी. व्ही. रामन यांनी नाड्यांच्या ऐतिहासिकतेवरील व निर्मितीच्या प्रश्नावर सोईस्कर बगल देऊन आपली गाडी पुढे दामटली आहे. असो.

श्री. कन्नन यांनी डॉ. रामन यांनी पाहिलेल्या नाड्यामध्ये आणखी नाड्यांची भर घातली आहे. ती अशी. सहदेव नाडी, नारद नाडी, नवग्रह संवादभाव, महर्षी सिद्धांत आदि. नवग्रह संवादात ग्रहच आपल्या सु किंवा कु प्रभावांचे वर्णन करतात व जातकाचे भविष्य पुढेपुढे सरकते. महर्षी सिद्धांत भावात १८ महर्षी चर्चा करत करत भविष्य सांगतात वा एखाद्या घटनेवर भाष्य करतात. श्री. कन्नन यांच्या लेखात त्यांनी वयाच्या १५ व्या वर्षापासून नाडी ग्रंथाचे अवलोकन करण्यास प्रारंभ केला. पुढे त्यांचा विवाह राहू भुक्तीमध्ये झाला व तो (शुक्र नाडीत) तसा नसून केतू भुक्तीमध्ये झाला. या एका गोष्टीमागील रहस्य हुडकण्यासाठी व नंतर पुढे ८ मुले झाली पैकी शेवटच्या २ जणांची गणना शुक्र नाडीत का नव्हती? इतर नाड्यात ती कशी मिळाली. यात बरेच रंगलेले दिसतात. नाडीवाचकांशी दोस्ती करणे. वेळप्रसंगी त्यांना जागा, घर, मिळवण्यास मदत करणे. ग्राहक मिळवण्यासाठी चार जणांशी संपर्क करणे त्यांनी भरपूर रस घेतलेला दिसतो. त्यांनी पाहिलेल्या नाडी भविष्याची नावे व लोकांचे उल्लेख वाचून व श्री. कन्नन यांना स्वतःचा पोटापाण्याचा काही नोकरीधंदा होता की नाही? नाडीवाचनात पैसे घालून ही त्यांचा संसार कसा चाले? असा प्रश्न पडण्या इतका नाडी भविष्याचा नाद दिसून येतो. शिवाय मद्रास व त्या खालील देशात कदाचित सायकल वा न्हाव्याची दुकाने कमी पण नाडी वाल्यांची केंद्रे जास्त असावीत. असा समज होण्याची शक्यता आहे. असो.

प्रस्तुत लेखकाची धावाधाव कमी नाही. श्री. कन्नन यांनी व आधी उल्लेख झालेल्या नाडीग्रंथा शिवाय या लेखकाने पाहिलेले नाडी ग्रंथ असे. इरटै नाडी, मीनाक्षी नाडी, वसिष्ठ नाडी, अगस्त्य नाडी, काक भुजंदर नाडी. आदि. आदि... ■

# नकाशा ओळख

## तमिळनाडूचा पूर्व भाग

| गोल क्रमांक | गावाचे नाव |
|---|---|
| (१) | मद्रास |
| (२) | तांबरम |
| (३) | कांचीपूरम |
| (४) | पांडीचेरी |
| (५) | तंजावर |
| (६) | त्रिची |
| (७) | कुंभ कोणम |
| (८) | मैलाडूतुरै |
| (९) | तिरुवन्नमलाई |
| (१०) | चिदंबरम |
| (११) | मदुराई |
| (१२) | सेलम |
| (१३) | सूर्यनार |
| (१४) | चंद्र- तिंगलूर |
| (१५) | मंगळ- वैदीश्वरन |
| (१६) | बुध- तिरुवेनकाडू |
| (१७) | गुरु- आलंगुडी |
| (१८) | शुक्र- कांजनूर |
| (१९) | शनि- तिरुनल्लार |
| (२०) | राहू- तिरुनागेश्वरम |
| (२१) | केतू- पेरुमाल |
| (२२) | [illegible] |



# नाडी शास्त्रींची नावे व पत्ते

वाचकांना सध्या नाडी ग्रंथ कुठे कुठे उपलब्ध आहेत. त्या ग्रंथांची नावे, नाडी शास्त्रींची नावे, पत्ते, फोन नंबर व आकारली जाणारी फी या संबंधी कल्पना यावी व त्याप्रमाणे जाण्या- येण्या व राहण्याची सोय करता यावी यासाठी एकत्रित माहिती देत आहे. पुढे काही वर्षांनी या माहितीत भर पडेल, जुन्या लोकांचे पत्ते, फोन नंबर बदलतील. फीमध्ये वेळोवेळी बदल होतील याची वाचकांनी नोंद घ्यावी.

पत्रव्यवहार इंग्रजीतूनच करावा

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडी ग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| 1 | Dorai Subburathinam, Sri KOUSHIHA AGASTHIYA-NADI | 36, New State Bank Colony, West Tambaram MADRAS 600 045. Behind Philips Hospital. (Monday Closed) Tele.: 2366264 | रु. 100/- + रु. 25 टेप प्रत्येककांडसाठी. इंग्रजीत सांगण्याची व्यवस्था. अंगठा छाप व कुंडली हवी. वेळ: सकाळी 8.30 ते रात्री 10 पर्यंत. |
| 2. | Karunakaran SUGARNADI- & Other Nadis Such As BUDH, SHIV-NADI, ETC. | 39, Ramaswami Street, T. Nagar, MADARAS 600 018. Near Archana Sweets shop. Tele.: 442109. (NO HOLIDAY) | Rs. 100/- + 25 टेप प्रत्येक कांडासाठी इंग्रजीची व्यवस्था. वेळ: सकाळी 9 ते रात्री 9 अंगठा छाप व कुंडली हवी. |
| 3. | Om Namah Shivayan AGASTHIYA NADI. | 27, Vandikaran Road, Off Velachery Road, GUINDY, MADRAS 600 032. Tele: 2340459 (NO HOLIDAY) | Rs. 100/- प्रत्येक कांडाचे. इंग्रजीची व्यवस्था. वेळ: 9.30 ते संध्या. 5.30 |
| 4. | Dr. Om Ulaganathan ERRATTAI NADI | 33, Palani Andavar Koil Street, Vada Palani, MADRAS 600 026. Near Vada Palani Murugan Tample. Tele.: 423988. (NO HOLIDAY) | रु. 1000/- (एक हजार) इंग्रजीची व्यवस्था नाही. नाडी शास्त्री वरिष्ठ नेते व पैसेवाल्यांच्या बोलावण्यावरून बरेच वेळा बाहेर फिरतात. |
| 5. | Dr Om Ulaganathan ERRATAI NADI (BRANCH) | 30, Muncipal High School Road, Kurangul Kuttai, ERODE 3. Tele.: 210999/ 211545 | Rs. 1000/- (एक हजार) अंगठा छाप व कुंडली हवी. |
| 6. | RAMANI SHASTRI KAK BHUJANDHAR NADI | 18, Alamelu Puram, East Tambaram SELAIYUR P.O. MADRAS 600 073. भारती इंजि. कॉलेजच्या समोरील कॉलनीत. Tele.: 2355595 | फी नाही- मोफत प्रश्नाचे उत्तर कवड्यांचे दान टाकून. सकाळी 6 ते 9. संध्या. 6 ते 9. |
| 7. | Mohan Sundaram AGATIYAR NADI | 19, New Bunglow Street. CHINTADRI PET, MADRAS 600 012. Tele: 845961. | Rs. 100/- प्रत्येककांडम, टेप- वही नाही. इंग्रजी येत नाही. वेळ: 10 ते 6 कुंडली हवी. |
| 8. | A. S. NATRAJAN SARMA PARA SHAR NADI | 22 Bandala Venkata Naidu Street, Near Ice House, TRIPLICANE. रस्त्याचे नाव गोंधळाचे आहे. MADRAS 600 005. Tele: 842688 | नक्की फी नाही. टेप वही नाही. इंग्रजीतून सोय. कुंडली हवी. नाडी संस्कृतमध्ये. सारखे आजारी असल्याने भविष्य सांगण्यास कमी इच्छुक. |
| 9. | Prof. A N K Swami MEENAKSHI NADI. | 1) 83, KUTCHERY Road, MADRAS 600 004. Tele.: 4940580. | Rs. 1000/- (एक हजार) काही महिन्यासाठी अमेरिकेत. इंग्रजीची सोय. भेट झाली नाही. |

| क्र. | नाडी शास्त्रींचे नाव व नाडी ग्रंथ | पत्ता व फोन नंबर | फी व इतर माहिती |
|---|---|---|---|
| | | 2) 16/B, Picnic Plaza, Luz Corner.<br>3) 2, R. K. Mutt, Mylapore. Madras 4. | |
| 10. | Mr. Karurakaran<br>Sugar Nadi. Branch of T. Nagar, Madras | 74, Satti Cross Road No. 1. Gandhi PURAM, COIMBATURE 12. | Rs. 100 + 25.<br>भेटलेलो नाही. जमवलेला पत्ता. |
| 11. | Poosai Muthu.<br>VASHISHTA NADI. | Vasishtha Nadi Nilayam by the side of Vaidiswaran Koil Pin 609 117. | फीज् माहित नाही. जमवलेली माहिती. |
| 12. | V S A Sami Sachuda Nantham<br>AGASTHIYA NADI | Sri Luxmi Dharma Illam 18, Jotida Salai Vaitiswaran Koil 609 117. | - (इलम- घर, सलाई- रस्ता कोईल- देऊळ) फीज माहित नाही. जमवलेली माहिती वैदीश्वरन कोईल बऱ्याच, नाडी शास्त्राचे मुख्यालय. |
| 13. | C. P. Jayshankar<br>AGASTIYA NADI | 101, Ganapathy Nagar TIRUVANAI KOIL, TRICHY. Pin 620 005. Tele.: 62190 | फीज माहीत नाही पण साधारण क्र. 1 प्रमाणेच असावी. यांची एक शाखा कोलंबो श्रीलंकेत आहे. |
| 14. | K Madhialahan<br>AGASTIYA NADI | 57, Brindavan Road, Parlands Murugan Koil Street SELAM Pin 636 016. | साधारण क्र. 1 प्रमाणे जमवलेली माहिती. भेट नाही. |
| 15. | D. Bal Subramaninum | 189 Periyar Nagar, Chinna KANCHIPURAM, CHENGULPATTE ROAD, KANCHIPURAM 631 503. (TUESDAY CLOSED) | फीज साधारण क्र. 1 प्रमाणे जमवलेली माहिती. |
| 16. | S. Manivasakan<br>AGASTIYA NADI | Bannerghatta Road, Bhavani Nagar 2nd Cross D R C (Post), BANGLORE 560 029. (Bangalore Dairy Circle Stop-) Bus Route No from Majeshtic 356, 365 from Shivajinagar, 161 D, 368.) | फीज साधारण क्र. 1 प्रमाणे. जमवलेली माहिती. इंग्रजीची सोय. |
| 17. | अमृत आनंद भृगू<br>भृगु संहिता<br>Amrit Anand Bhrugu<br>Bhrugu Sanhita | रेलमंडी, होशियारपूर, पंजाब<br>Rail Mandi, Hoshiyarpur (Punjab) | रु. ५००/- याच गावात आणखी ७/८ जणही भविष्य सांगतात. भेट नाही. |
| 18. | स्व. बाबूभाई छायाशास्त्री जोशी<br>सूर्य आणि इतर संहिता<br>Chhaya Shastri Joshi | Rawal Building, Near YMCA Building, 2nd floor, Lamington Road, Bombay 4. | फीज् साधारण रु. ४०० च्या वर |
| 19. | पं. डॉ. रश्मीकांत व्यास<br>Pt. Dr. Rashmikant Vyas | भारती भवन, महाकाल, उज्जैन, मध्य प्रदेश<br>Bharati Bhavan, Mahakal, Ujjain, M.P. | ५५१ व ११११ रु. कामांच्या स्वरूपावर |
| 20. | पं. जुगल जोशी<br>अरुण संहिता | 3/4313 Anari Road, Dariya Ganj<br>New Delhi 110 002. Tele.: 3272286, 3269431 | भेट नाही. फीज् नक्की कळलेल्या नाहीत. |

# उत्साही अन्नूजी आणि नाडी भविष्य

आमच्या समोरील क्वार्टरमध्ये एक विंग कमांडर कुटुंब राहते. त्यांच्या सौभाग्यवती अन्नू उत्साहाचे मूर्तीमंत उदाहरण ! खाण्यापिण्याच्या सर्व पदार्थात एक्सपर्ट, कॉम्प्युटर सायन्समध्ये प्रवीण, केश- वेषभूषेतील तज्ञ, इंग्रजी हिंदीत मिठ्ठास बोलणे. पंजाबी अगत्यशीलता. केरळी पतीशी "घरवालोंसे झगडकर" शादी करणाऱ्या व दोन्ही घराण्यांची गडगंज श्रीमंती भोगणाऱ्या या बाईंची मुले अती हुशार. तेव्हा मुलांचे अभ्यास घेणे, घर सांभाळणे वगैरे सटरफटर गोष्टीत रस कमी. घरात २/३ तऱ्हेची वाहने. बाईंचा वाहनांवरून सर्वत्र संचार. मी चेष्टेने "लेडी ऑन दी व्हील" असे म्हणतो. तेव्हा त्या हसून दाद देतात.

वरील वर्णन अशा साठी की वाचकांना अन्नूजींचे व्यक्तिमत्त्व डोळ्या समोर यावे. नाडी ज्योतिषासंबंधी त्यांच्यापाशी विषय निघाला व विंग कमांडर साहेबांच्या बडीलांकडील घरच्यांनी फारच मनावर घेतले. ते मद्रासमध्येच गेली कित्येक वर्षे स्थायिक आहेत. ८-१० जणांचा भविष्य पाहायचा कार्यक्रम झाला. नाडी केंद्राला भेट घ्यायला आले की नाते वाईकांचा यांच्या घराचा भोज्या ठरलेला ! बाईंना इतरांनी भविष्य पाहिलेले पाहून स्फुरण आले व त्याही तेथे पोहोचल्या.

२-३ तासाच्या कंटाळवाण्या वाट पाहण्यानंतर त्यांचा ओला (तमिळमध्ये पत्र/ पान) न सापडल्याने कदाचित, त्यांना बऱ्याच 'भयंकर' शंका येऊ लागल्या. त्या निरसन करण्यासाठी, "तुझ्या नवऱ्याला म्हणाव. मी संध्याकाळी वादावादी करायला येतेय कुठे पळून जाऊ नकोस. बता देती हूं- "सब बकवास है" वगैरे आमच्या मंडळींना सांगण्यात आले.

माझी मुलगी नेहा चिंताक्रांत मुद्रेने आता तू अन्नू आंटींशी हरणार, तर नाहीस ना ? असे वरच्या वर विचारत होती. माझ्या पत्नीचा दोन्ही डगरीवर हात ! इकडे आपला नवरा तिच्या शंकांचे निरसन करणार याची खात्री, तर तिकडे आपला नवरा नाडीच्या फारच नादी लागलाय त्याला वठणीवर आणणारे कोणी असेल, तर बरेच असे वाटत होते ! संध्याकाळी आमची मेहफिल जमली. चहाचे गरम कप हातात आल्यावर अन्नूजी म्हणाल्या, "भाईसाब मुझे तो ये सब बकवास लगता है। देखने जाने वाले लोग पागल और दिखाने वाले भी बेवकूफ।" फास्ट बोलींग सुरू झाली होती. आऊट साईड दी ऑफ स्टंपच्या बॉल वर बॅट टाकून कॅच आऊट व्हायचे नव्हते !

मी हसून. म्हणालो, "अगदी खरे आहे. भविष्य पाहाणे हा खरा तर एक वेडे पणाच आहे. भविष्य सांगणारे तुम्हाला वेडे बनवायलाच बसलेले असतात."

"आज हजारोंच्या संख्येने रस्त्यावर, गल्ली- बोळात मेळे यात्रा यांत गर्दीच्या ठिकाणी दुकाने, तंबू ठोकून जे रोज भविष्य सांगण्याचा धंदा करतात. ते स्वतःचे भविष्य, हात पाहून गंडेदोरे, खडे, अंगठ्या बाळगून स्वतःचे जीवन का नाही उज्ज्वल बनवत ?" करोडोपती कसे व्हावे "या पुस्तकाचा लेखक आपल्या पुस्तकाच्या हस्तलिखिताची बाडे घेऊन प्रकाशकाच्या दरवाजावर का खेटे घालताना दिसतो ? असे असूनही ही पुस्तके हजारोंच्या संख्येने विकली जातात. ज्योतिषांची कार्यालये सदैव भरगच्च असतात. असे का व्हावे ? भविष्य जाणणारा वेडा व त्याला वेडा करणारही वेडा असावा असे तर नाही ?"

हे मान्य आहे, की जे उद्या घडणार आहे ते मला आज कळले तर जसे सस्पेन्स सिनेमातील शेवटच्या रिळातील सत्य- खरा खुनी कोण ? हे मला आधी कळले तर आधीच्या रिळातील रंजकता जशी जाईल, तसे मग मला उद्याचे व त्यानंतरचे जीवन मिळमिळीत वाटेल. काहींना वाईट घडेल याची धाकधूक वाटत राहील किंवा चांगले घडणार याचा फाजिल खात्रीने काहींना निष्क्रिय बनायला होईल !

अन्नूजी, शायद आप को पता नही, १९८३ मध्ये मी दिल्लीला असताना एक नाटक बृहन महाराष्ट्र नाट्य स्पर्धेसाठी बसवले होते. त्याचे नाव होते 'गुलाम'. मराठी मधील प्रथितयश लेखक, नाटककार शं. ना. नवरे यांनी ते लिहिले होते. प्रमुख भूमिका व दिग्दर्शन माझे होते. विषय होता भविष्य पाहण्याने नायकाची कशी दशा झाली ! "भविष्याच्या नादी लागून भविष्याचा 'गुलाम' बनू नकोस. आपले कर्म करत राहा. भविष्य आपोआप घडेल." असा संदेश त्यात होता. नाटककार नाटकात एका बाजूला भविष्यातील घटना अचूक घडत राहण्याची दक्षता घेतात. त्यामुळे दुसऱ्या बाजूस त्यावर फाजिल विश्वास ठेवणारा नायक कळत न कळत नालायक बनतो. असे दाखवले आहे. 'पहा', मी म्हटलं नाही", अन्नूजींचा चेहरा खुलला

होता.

मला हेच म्हणायचे आहे. नाटककार ही नाटकात सांगितले गेलेले भविष्य तंतोतंत बरोबर ठरते आहे. याच पायावर नाटकाची उभारणी करतात; पण हे भविष्य खरे ठरतेय कसे ? ते लिहिणारा लेखक कोण ? त्याची काय लायकी ? त्याचा भविष्य लिहिण्याचा हेतू काय ? याच्याकडे महत्त्व देत नाहीत. नेमक्या याच बाजूंवर माझे लक्ष केंद्रित झाले आहे.

ज्याला भविष्यात सांगितलेले चांगले आणि वाईट काय काय घडणार याची चिंता रात्रंदिवस जाळते. तो ते भविष्य पाहायला नालायक आहे; पण हे भविष्य काय गौड बंगाल आहे याचा शोध घेणे, मानवतेला या विद्येचा कशा तऱ्हेने उपयोग होऊ शकतो. याबाबत विचार करणे, हे अगदी वेगळे. माझी अशी धारणा आहे जे असे घाबरट, चिंतातुर जंतू असतील त्यांचे भविष्य नाडी कर्त्यांनी न लिहूनच उपकार केले असतील.

अन्नूजी विषय बदलत म्हणाल्या, ''बर ते असो; पण या नाडीवाल्या लोकांबद्दल बोला. मला त्यांनी बोलावले ३ वाजता; पण ५ वाजेपर्यंत मी नुसती आढ्याकडे बघत होते ! कुछ चाय कॉफी का भी ख्याल किसीने नही किया !'' त्यांना तर लोकांच्या वेळेचे महत्व काहीच नाही. माझी किट्टी पार्टी सोडून मी आले त्याचे काय ?

अन्नूजी, कदाचित तुम्ही प्रथम तिथे गेलात म्हणून तुम्हाला असे वाटले असेल; पण या नाडी भविष्यातील महत्त्वाचा टप्पा हा अंगठ्याच्या ठशावरून तुमचे पान शोधेपर्यंत त्या ताडपत्रांचा एक सारखा पाठपुरावा करणे हा असल्याने एकाचे पान लगेच निघेल तर दुसऱ्याला तासनुतास तिष्ठत बसावे लागेल. त्याला कोण काय करणार ? त्यामुळे एकाच्या नाडीला सोडून दुसऱ्याच्या नाडीला हात घालेपर्यंत त्यांना वेळ हा लागणारच ! मी मजेने म्हणालो. बरं चहा- पाण्याची तशी सोय आहे पण आपण पदरचे पैसे देऊन. असो.

'खैर वो छोडो', मुझे आप से यह कहना है की ये लोग तो हमसे ही पूछ पूछ कर बाते जान लेते है और फिर हमे बताते है !

मला या प्रश्नाची अपेक्षा होतीच कारण बऱ्याच जणांचा हाच ग्रह व आक्षेप मी ऐकून होतो. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे नाडी वाचक एकपत्र हातात घेऊन म्हणतो तुमच्या नावात ३ अक्षरे आहेत का ? तुम्ही फक्त हो की नाही म्हणायचे, पण माणूस अनवधानाने नाही ४ अक्षरे असे खरे बोलून जातो. आई जीवित की मृत ? या प्रश्नाचे उत्तर त्याच्या जवळ जमा होते. पुढे तुमच्या वडिलांच्या नावाची सुरवात पफबभम, यरलवश यातील अक्षराने होते का ? या सारख्या प्रश्नांनी तुमच्याकडील नावांची व इतर माहिती न कळत काढली जाते आणि नंतर काही पत्रे नाटक करण्यासाठी बाद करत एका पत्रात तुमचे व इतरांचे नाव आधीच्या मिळालेल्या माहितीच्या आधाराने तुम्हास सांगून चकीत करतो. पुढील भविष्यातही थोडी फार मखलाशी करत तुम्हाला गंडवतो व तुम्ही समाधानाने १०० रु. ची दक्षणा देऊन वही आणि टेप घेऊन घरी येता !

तुम्हीच कशाला मद्रास ओरिएंटल मॅन्यू स्क्रीप्ट लायब्ररीचा क्युरेटर ज्याच्याकडे ध्रूव, सप्तर्षी, देव, केरलम नाडीच्या ताडपत्र्या सांभाळण्याचे काम रीतसर दिले आहे. त्याचेही हेच मत ऐकून मी चाट पडलो. मी त्याला जे विचारलं तेच तुम्हाला विचारतो. ''तुम्ही तुमचे पत्र (ओला) पाहिलात का ?'' त्याने पाहिलेले नव्हते. त्याने मनानेच असे सर्व घडत असणार, असे मानले. तीच गोष्ट तुमची. आता तुम्ही ओला पाहताना दक्षता घ्या, की ते तुमच्याकडून माहिती काढून तुम्हाला सांगणार नाहीत. मग मला सांगा तुमचे काय मत होते ते !

त्यानंतर पुढे अन्नूजींना त्यांचा ओला सापडला. त्यांच्या मोकळ्या स्वभावानुसार त्यांनी कॅसेट ऐकायला दिली. आता त्यांचे मत एकमत बदलले होते. 'अविश्वसनीय चमत्कार' या शब्दात ते नाडी भविष्याचे वर्णन करतात. आपल्याकडून माहिती काढून तीच परत मखलशीने आपणास सांगतात. या आक्षेपाबाबत जेव्हा ''मी माझ्या डोळ्यांनी माझे, माझ्या आई-वडील व नवऱ्याचे नाव त्या पट्टीत सध्याच्या तमिळ लिपित कोरलेले पाहिले'' तेव्हा त्या आक्षेपातील हवा केव्हाच निघून गेली. माझी माहिती घेऊन त्या पट्ट्यात माझ्यासमोर कशीतरी करून ती माहिती कोरणे अशक्य आहे.. पट्टीतील इतर मजकूर खुद्द तमिळ जाणणाऱ्या वाचता येत नाही. फक्त संबंधित माणसांची नाते तमिळ भाषा वाचणाऱ्याला अगदी सुस्पष्ट वाचायला येतात !

पुढे काही दिवसांनी पुन्हा गप्पांच्या संदर्भात अन्नूबाई गुरगुरल्या, ''नाडी वालों ने तो लूट मचा के रखी है ! हमारे यहाँ मेरी सांस, नंनद आदी लोग तो बडे धार्मिक है। अब तक उन्होंने ४० हजार रुपयों तक पैसे फूंक डाले।''

जनरल कांडममध्ये म्हणतात, तुमच्या पूर्व जन्मांच्या पापामुळे व सध्याच्या ग्रहदोषांमुळे पुढे काही त्रास व वाईट घटना घडण्याची शक्यता आहे; पण घाबरू नका. १३ व १४ व्या शांती व दीक्षा कांडात सांगितलेले उपचार आपण केलेत, तर शांत आणि सुखी जीवन जगाल. आता असे म्हटल्यावर ''कौन माईका लाल'' १३ व १४ नंबरचे कांड वाचायचे राहाणार ? ते पाहायला प्रत्येकी पुन्हा १०० रुपयांचा टोला.

आता जर तुम्ही पूर्व जन्मांत जास्त पापी निघालात तर शांतीसाठी स्वाभाविकच जास्त धावाधाव करावी लागेल. या देवळात जा. तेथे अमूक मूर्तीला अभिषेक करून दुसऱ्या मंदिरात जा. तेथील ३/४ मूर्तींना अर्चना, पूजा अभिषेक करून ९ अपंग, अनाथांना भोजन देऊन तृप्त करा. इतके दीप या वारी लावा, वगैरे, वगैरे.

याशिवाय नाडी वाचकाला इतके रुपये दक्षिणा, धोतर (लुंगी), साडी, ५

(पान २७ पाहा)

# शांती दीक्षा

स्टेशनवर गाडी थांबली. काही लोक उतरले. चढणाऱ्यांची धांदल उडली. त्यातच एक गृहस्थ ट्रंक-वळकटी, फिरकीचा तांब्या वगैरे सामानाचा डोलारा डोक्यावरून आणते झाले. तेवढ्यात गाडी सुटली. थोडे स्थिर-स्थावर झाले तरी गृहस्थांच्या डोक्यावरचे सामान डोक्यावरच!

एक पोक्त बाईंना राहवेना म्हणाल्या, "भाऊ बाईचं सरकवा लोकास्नी अन् ठेवा की डोक्यावरचा भार खाली!"

गृहस्थांनी तिच्याकडे दुर्लक्ष केले. गृहस्थ होते रुबाबदार, नियम निष्ठेचा प्रभाव देहावर होता. कपाळाला गंध-बुक्का, पांढरा शर्ट वर कोट, खाली दुटांगी धोतर! रेल्वेच्या डब्यात स्वतःचे सामान डोक्यावर घेऊन प्रवास करणारे 'ध्यान' पाहून इतर प्रवाशांना हास्य लपवणे अशक्य होते.

एकाने धीर करून प्रश्न विचारला. "आपण सामान खाली का ठेवत नाही?"

"प्रश्न तत्वाचा आहे. मी माझे तिकिट काढले आहे. माझ्या सामानाचे नाही. तेव्हा त्याचा भार मी माझ्यावर ठेवायला हवा!" गृहस्थांनी तोंड उघडले होते.

"ते बरीक बरोबर आहे. पण रेल्वेवाल्यांना जर चालते तर मग तुम्ही डोक्यावर सामान घेतले किंवा खाली ठेवले काय, शेवटी रुळांवरच भार पडतो ना? मग कशाला हा त्रास सहन करावा" एका प्रवाशाने साधा युक्तीवाद मांडला

"त्याच काय आहे, तुम्ही आपले नाडी भविष्य पाहिलेत काय? नाही ना? मग पहा आणि मग माझ्याशी बोला"

"काय हो, आत्तापर्यंत मला दोन नाड्या माहिती होत्या एक दादा कोंडक्यांच्या अजागळ चड्डीची नाडी आणि ठोके तपासतात ती मनगटातली नाडी" आता ही तिसरी नाडी कुठली काढता राव!" एक मामा पचकले.

"अंगठ्याच्या ठशावरून ताडपत्र्याच्या पट्ट्यात वाचून जे भविष्य सांगतात त्याला नाडी भविष्य म्हणतात. मी तसे नुकतेच पाहिले. त्यातील शांती व दीक्षा कांडात सांगितलेले सोपस्कर करायला खाली दक्षिणेत चाललो आहे."

"म्हणजे कोण ते एअर फोर्सचे ओक यांचा लेख वाचून आपण भविष्य पाहून आलात पण?"

"हो मग? अंगठ्याचे छाप व पैसे त्यांना पोस्टाने पाठवून ते भविष्य हुडकून लिहून पाठवतील. असा गळ टाकून बसणाऱ्यांपैकी मी नाही!"

"ते ठीक आहे. पण ती शांती-दीक्षा आणि हे डोक्यावरचे सामान याचे काय गौड बंगाल आहे?"

"त्याच असं आहे की आपल्याला भविष्य माहिती नसेल तर" काय व्हायचे असेल ते होऊ दे" असे म्हणून सर्व देवावर सोपवून आपण मोकळे होतो. मात्र नाडी भविष्यात पुढचे एक एक भविष्य ऐकले की मन सैरभैर होते. काहींच्या लग्नाचे अडून असते. काहींना संतती नसल्याचे वैषम्य असते. काहींना नोकरी नाही. घेतल्या कामात यश नाही. हजार तऱ्हांच्या तापदायक त्रासा-जाचातून मुक्ती व्हावी वाटत असेल तर शांती-दीक्षा कांड पहावे असे सुचवले जाते. त्यात विविध धार्मिक स्थळांना भेटी, ग्रहशांतीसाठी त्या त्या ग्रहांच्या मंदिरात पूजा-अर्चा काही अपंगांना अन्नदान, कधी-कधी ब्राह्मणांना बोलावून शांती- होम असे विविध तऱ्हांनी मार्ग सुचवले असतात."

"अरे वा! भविष्याबरोबर या संकटांवर मात करता येणे शक्य आहे असेही लिहिलंय? मग पहायलाच हवे!" एकानं अभिप्राय दिला.

"आता या सर्वात गैर काय आहे? नाही तरी वारीला यात्रा-सहलीला आपण जातोच की तसे तेथे जाऊन मजा व पूजा करावी आणि शिवाय संकटावर मात करण्यात यश मिळवावे!" एकानं फारच पटलेले वाटले!

भविष्यातील वाईट घटना घडू नयेत आणि अपेक्षित घटना मात्र नक्की घडाव्यात यासाठी देवावर अभिषेक घालायला लांबलाबच्या यात्रा, सुट्टी, रजा, जाण्या-येण्याचा प्रवास, राहण्याची गैरसोय, भाषेचा प्रश्न शिवाय खर्च किती!" एकानां प्रापंचिक पेच पडला असावा!

"अनाथ अपंगांना अन्नदान करून त्यांच्या तृप्तीचे आशीर्वाद मिळवणे फार महत्त्वाचे"

"देवालयाच्या बाहेर बसलेल्या अपंग अनाथांना जेवायला घालून तुम्ही त्यांची भूक भागवता व आयते पुण्य कमावता? हे चूक आहे! खरे तर ही सरकारची जबाबदारी आहे" प्रत्येक बाबतीत उठसूठ सरकारची चुकी व बांधिलकी दाखवणाऱ्या फर्नांडिसी आवेशात एकांचा सुर उमटला.

"ते एक वेळ क्षम्य आहे. पण भविष्यात त्रासदायक घडेल असे लिहिले आहे म्हणून किंवा न पाहिलेल्या पूर्व जन्मांतील पापांच्यासाठी मंदिरातल्या दगडाच्या मूर्तीवर पंचाभिषेक

पूजा-अर्चा म्हणजे चक्क वेडगळपणा आहे'' स्वर समाजवादी वाटत होता.

''जो पर्यंत भविष्य अज्ञान होते तो पर्यंत देवावर सोपवता येत होते. आता माझ्या पापांचे गाडे व त्रास यांची माहिती झाल्यावर नुसताच देवावर भार सोडून कसा चालेल? त्यासाठी मला नको का पुढाकार घेऊन तो भार सहन करायला?''

नाडी-भविष्य पहिले की शांती-दीक्षा करावीशी वाटते. किंबहुना करायची असते म्हणूनही ते भविष्य पाहिले जात असावे. मग शांती दीक्षा करायला सज्ज झालेला. स्वतःच्या पापांचा बोजा स्वतःच्या डोक्यावर घेतो. व गाडीतील त्या गृहस्थांसारखा दिसायला लागतो.

गाडी पुढे जात होती, पण प्रत्येक प्रवासी नाडी भविष्याबाबत विचारात गुंगला होता.

''पण जर भविष्यात पुढे वाईट होणार असेल तर मग त्याला अगस्त्य किंवा इतर नाडी-महर्षी तरी काय करणार?'' एकांना पेच वाटला.

''अगदी बरोबर असे पहा बाहेर पाऊस पडतोय तर आपण काय करतो छत्री उघडून पावसापासून रक्षण करून घेतो. पाऊस थांबवण्याची क्षमता आपल्यात नाही हे मान्य, पण त्याचे शिंतोडे आपणावर पडणार नाहीत याची दक्षता तर आपण घेऊ शकतो. तेच काम शांती-दीक्षा कांडातील उपाय करतात असे मानले तर?''

**''नाडी अवलोकन करताना चिकित्सक बुद्धी जरूरी हवी. शांती दीक्षा कांडातील सोपस्कर पटत नसतील त्यांनी त्या वाटेला जाऊ नये. ज्यांना करावेसे वाटतात त्यांनी मात्र उच्च भाविकतेने करावेत. कोरडेपणाने अश्रद्धपणे केले तर जाण्या-येण्याचा खटाटोप, पैसे व्यर्थ जातील तेव्हा सावधान.''**

''मनातून खूप वाटतं की अगदी मन लावून पूजा-अर्चा करावी. मंदिरे न्याहाळावीत भाविक होऊन दगडात दडलेला देव धुंडाळावा. पण सध्याची पोझिशन आड येते. गणेशचतुर्थीच्या वेळी वाटेत मांडलेल्या गणपतीच्या मूर्तीसमोर हात जोडवत नाहीत! आता मंदिरात जायला ऑकवर्ड वाटत. कोणी पाहिले तर लोक काय म्हणतील! घरी होम-हवन करू म्हटलं तर अंगचोरट्या प्रमाणे वाटत! ओळखीच्यांची धास्ती वाटते. सर्व घाबरट विचार मागे टाकून, तर्क-वितर्क करण्याचे सोडून हा वेष घेतला व प्रोफेसर असूनही सामानाचा बोजा सांभाळत निघालोय तीर्थाटनाला.''

प्रवासी आपआपल्या गावी खाली उतरले. घरी गेले पण प्रत्येकांच्या मनांत आपण जर भविष्य पाहिले तर आपण काय करावे याचे द्वंद्व चालू होते.

■

---

## उत्साही अन्नुजी / (पान २५ वरून)

फळे. मिठाईचे पॅकेट वगैरेंचा नैवेद्य घ्यायचा तो वेगळाच. आजच्या जमान्यात लोकाला प्रवास, राहाणे जेवणखाण यावर किती पैसा ओतावा लागेल कल्पना करा. आमच्याकडे A.C. कारने जाणे येणे. शिवाय ५/७ जणांची शांतीदीक्षा एकदम मग पाहा किती खर्च आला असेल!

अन्नूजींचे म्हणणे अक्षरशः खरे आहे. अंगठ्यांचा ठसा देऊन जनरल कांडमचे भविष्य पाहिले व त्याची टेप घेतली. याला (निदान ऑगस्ट १९९४ मध्ये) १२५ रुपये खर्च येतो. हे खरे, पण भविष्यकाळात काही अरिष्टे अंगाशी न येता परस्पर टाळावीत या काळजीने माणसाला शांती दिक्षा पाहणे तातडीचे व महत्वाचे वाटते. त्यात सुचवलेले मार्ग मंदिरांना भेटी नाडी. वाचकांना दक्षिणा वगैरे कामे खूपच खर्चिक आहेत. याशिवाय ज्यांना बाराच्या बारा कांडे पाहयची आहेत त्याला प्रत्येकी १०० रु. पैसे घालाल तेवढे कमीच आहेत!

माझा सर्वसाधारण अंदाज असा आहे, की सर्व कांडे पाहून शांतीदीक्षा करण्यासाठी प्रत्येकी ५ ते ७ हजारपर्यंत खर्च होण्याची शक्यता आहे. शिवाय आपल्या परीने जाण्यायेण्याचा व राहण्या, खाण्यापिण्याचा खर्च करावयाचा!

आता माझेच पहा ना. शांतीसाठी राहू पुजा एका मंदिरात, तर दुसरीकडे ४ मूर्तींच्यावर पूजा अर्चा करण्यासाठी २/३ ठिकाणी जाऊन आलो. शिवाय ९ अपंगांना भोजन देऊन तृप्त केले. शिवाय गणेश यागात ९ ब्राह्मण भोजन दक्षिणा या सर्वांत माझे ४ ते ५ हजार गेलेत!

'ओक साब, आप भी इस पूजा- पाठ और शांती दीक्षा में विश्वास करते है?

हा मुद्दा प्रत्येकाच्याच ओठावर असल्याने याबाबतचे विचार इतरत्र मांडले आहेत.

मराठी वाचकांना या अन्नूबाई कोण याबाबत फार उत्सुकता वाटणार नाही, पण कदाचित एअर फोर्स संबंधित कोणी वाचक असतील, तर त्यांच्या समाधानासाठी अन्नूजींची थोडीशी माहिती त्यांच्या संमतीने देत आहे. विकारी नाम संवत्सरात मासी महिन्यात तमिळ कॅलेंडरप्रमाणे १२ व्या तिथीला बुधवारी, उत्तरा आषाढा या नक्षत्रात.

जन्म पावलेली जातकी चांगल्या कुळातील आहे. सर्वांत धाकटे अपत्य. आईवडील (ऑगस्ट १९९४ मध्ये) जीवित. एक मोठी बहीण विवाहित. परजातीयाशी लग्न. १ मुलगी, १ मुलगा शालेय शिक्षण घेत आहेत. नवरा सरकारी नोकरीत अधिकारी पदावर आहे. अशा जातकीचे नाव अनुराधा, वडिलांचे नाव- योगराज, आईचे- शीला व यजमानांचे नाव गोविंदन. (सर्व माहिती तंतोतंत बरोबर) यजमान FIS मध्ये विंग कमांडर पी. एन. आर. गोविंद या नावाने इन्स्ट्रक्टर आहेत.

■

# भृगू संहिता आणि मी

मुंबईतील लॅमिंग्टन रोडवरील बाबूभाईंचे नाव मी माझ्या वडिलांकडून व इतर नातेवाईकांकडून ऐकले होते. लहानपणी केव्हातरी कै. शांताराम आठवल्यांच्या लेखातून ही त्यांचे नाव वाचल्याचे आठवत होते. पण तेथे जाण्याचा प्रसंग कधी आला नाही. मुद्दाम उठून जावे असे ही काही घडले नव्हते.

जुलै १९७६ मध्ये माझ्यावर अपघाताचा प्रसंग आला. त्यात माझी पत्नी छायाचे निधन झाले. त्यानंतर दीर्घसुटी घेऊन मी घरी होतो. श्रीनगरला कामावर रूजू होण्यासाठी वाटेत डोंबिवलीत ४ दिवस बहिणीकडे थांबून पुढे जाण्यासाठी उतरलो होतो.

बहिणीचे यजमान अविनाश रानडे म्हणजे माझ्या गल्लीतील, शाळेतील यार-दोस्त असल्याने आम्ही नुसतेच नातेवाईक नव्हतो. सहज मुंबईत फिरत असताना अविनाशला एकदम हुक्की आली. म्हणाला, 'शश्या, चल आपण छाया ज्योतिषाकडे जायचं का? मी हो म्हणताच. आम्ही छायाशास्त्री बाबूभाईंच्या घरी पोहोचलो.

२७ नोव्हेंबर ७६ दिवस. दुपारची १२ ची वेळ असावी. आम्हास पाहून शास्त्रींनी (कै. बाबूभाईंच्या चिरंजीवांनी) वेळ ठरवून आलात काय? नाही तर आज शक्य नाही. म्हणून आम्हास वाटाण्याच्या अक्षता दाखवल्या. पण मी जरा जोर धरून. एअर फोर्समध्ये आहे. श्रीनगरहून आलोय. परत येणे जमणार नाही. वगैरे बोलून त्यांना आज आणि तेही आत्ताच (!) भविष्य दाखवण्याची गळ घातली. २-३० ला या. पुढील अपॉइंटमेंट ३-३० ला आहे. त्या आधी तुमचे काम उरकू या. असे म्हणताच वेळेवर पुन्हा हजर झालो.

माझी पत्रिका त्या दिवसात खिशात पडलेली असे. ती पुढे मांडून काही वेळाने शास्त्रींजींनी टेबलावर असलेल्या भूर्ज पत्रातून थोडीशी पत्रे पुढे मागे करून १५-२० हातात मावतील अशी गड्डी हातात घेतली व नमस्कार करून वाचायला आरंभ केला.

माझी अशी धारणा होती की, शास्त्रीजी पत्रिका घेऊन आपल्या भूर्जपत्रांच्या 'लायब्ररीत' जातील व माझे भूर्जपत्र असलेला गठ्ठा धूळ फुंकत आणतील. पाहतो तर शास्त्रीजींनी आपले बूडही न हलवता माझ्या संदर्भातील भूर्जपत्रे हातात घेतली. याबाबत विचारता, ''साधारण, आम्हाला अंदाज असतो की, या गठ्ठ्यातल्या व्यक्तींचं भविष्य पहायला येणार आहेत वगैरे. हिंदी, इंग्रजी, गुजराथी की मराठी कोणत्या भाषेत भविष्य सांगू?'' असे विचारत कागद पेन हातात देत वाचनाला प्रारंभ झाला.

साधारण १५-२० पट्ट्या स्वतःचे नाव, आई वडिलांचे नाव यातच बाद झाल्या. पुढे एका पट्टीत सर्व बरोबर आले वडिलांचे नाव जगन्नाथ- ते नाही म्हणताच तीही पट्टी त्याने खाली टाकली. मी तीच पट्टी असण्याची शक्यता सुचवून पाहिली. त्याने पट्ट्या वाचून खाली टाकायचा धडाका चालू ठेवला. एक पट्टी बरोबर फिट बसली.

'जन्मगाव प,ठ,ण पासून सुरू. म्हणजेच पुणे विप्रकुलात जन्म. वसिष्ठ गोत्र, चित्तपावन. (सर्व बरोबर) (जन्मतारीख ३१ जुलै १९४९). ११ व्या वर्षी गळ्याचे ऑपरेशन (६० साली टॉन्सिलचे ओपरेशन) भाऊ नाही, बहिणी २. (बरोबर)

१७-१८ व्या वर्षी कॉलेज प्रवेश. २२ व्या वर्षी संरक्षण विभागात राजपत्रित नोकरी त्यात 'उड्डयन' (वायूसेना Air Force हा शास्त्रींचा शब्द) विशेषत्वाने. (सर्व बरोबर).

२६ व्या वर्षी स्वजातीय मुलीशी लग्न. (२ मार्च ७५ छाया बेहेरेशी विवाह). २७ व्या वर्षी मंगळ खराबीने पत्नीचा देहांत. नाव छाया.

आई- मंगला, वडील- जनार्दन (तेव्हा) जीवित.

जातकाचे नाव- शशिकांत- याची गाथा. ग्रंथाचे अवलोकन केलेली व्यक्ती सोबत. (सर्व बरोबर).

पुढील भागात भविष्य वर्तवले होते ते असे.

हवाई किल्ले बांधायची विचार सरणी. (कल्पना शक्तीचा वापर करून लोकांचे मनोरंजन कराल- इति अगस्त्य मुनी! कांडनं. ११ मधे! (विविध विषयांवर भाषा, सामान्यज्ञान, खेळ, सिनेमा, टीव्ही जगत यावर मराठी, हिंदी व इंग्रजीत कोडी बनवण्याचा छंद)

३२ व्या वर्षापर्यंत पुन्हा लग्नाचा योग आहे. मंगळ कार्याआधी कार्मुक शांती करावी म्हणजे पुढे विघ्न नाही. (माझी मनस्थिती पुन्हा लग्न करण्याबाबत तेव्हा उदासीन होती. वडिलांनी पुढे कार्मुक शांती केली असा लेखी उल्लेख माझ्या टिपणावर आढळतो.)

भावी पत्नी स्वजातीय, विद्यावान, जास्त उंच नाही. गोरी, सशक्त, उग्र व तापट स्वभावाची असेल. (सर्व पुढे बरोबर आले.) १४ व्या, २६ व्या व ३० व्या वर्षी जो कोणी आयुष्यात येईल त्याचा मृत्यू योग! (१४ व्या वर्षी कोणी

आयुष्यात आले नाही, २६ व्या वर्षात पत्नीचा वियोग. ३० व्या वर्षाच्या सुरवातीला दोन दिवस असताना (२९ जुलै ७८ पहिल्या अपत्याचे आगमन झाले म्हणून कदाचित तो अजून तरी जीवित!)

३४-३५ व्या वर्षी पित्याचे निधन. (वडील ३२ व्या वर्षीच निवर्तले.)

४५ व्या वर्षापर्यंत मातेचे सुख (आई माझ्या वयाच्या ४६ व्या वर्षातही (१९९४) खणखणीत जीवित! (५५ किंवा त्याच्या पुढेही मातेचे सुख इति श्री अगस्त्य मुनी कांड नं. ४)

या पुढील भविष्यात ५५/५६ व्या वर्षी रिटायर मुलामुलींचे मंगल कार्य व हृदय व्याधीने ६४ व्या वर्षी मृत्यू योग असा थोडक्यात पुढील घटना क्रम दिला आहे. (श्री अगस्त्य मुनी आयुष्याच्या बाबत जास्त उदार वाटतात. त्यात पुढेही भरपूर आयुष्य आहे असे आठव्या कांडात वर्तवले आहे.)

वरील सर्व वाचन झाल्यावर (कंसातील सोडून) मी भारावलो होतो.

मला त्यावेळी नुकताच झालेला अपघात कसा घडला? पत्नीचे निधन का झाले? हे जाणण्याची तीव्र उत्सुकता लागली. यासाठी वेगळे पैसे घेऊन शास्त्रीजींनी ते कांड वाचले. त्यात माहिती अशी होती, अकस्मात देहांत. २ चाकाच्या वाहनाने जात असताना चार पायाच्या जनावराशी टक्कर. या पुढील माहितीत २-३ मुनींत मतांतर झाले.

एकाचे मत पडले की, पशुने पतीपत्नींना मारले. पतीस ते कळले नाही. पण पत्नी लगेच भिऊन उठली व पळण्याच्या गडबडीत पडली व डोक्यास मार लागून वारली.

दुसरे मुनी असे मत व्यक्त करतात की, पशुच्या पायदळी पत्नीचे डोके आले. तिसऱ्या मुनींना पशुच्या शिंगांचा डोक्यास मार लागला म्हणून निधन असे वाटते.

या सर्वांच्या मतानंतर भृगूनी असे म्हटले की, वाहनाला पशुचे पोट लागले व तोल गेल्याने ती पडली व डोक्यास मार लागल्याने मृत्यू आला. (भृगूऋषींचे मत मला जास्त जवळचे वाटते. त्याचे असे झाले की, मी चंदीगडला पोस्टींगला असताना मी व छाया स्कूटरवरून पिंजोर गार्डन्स पहायला एका रविवारी (गुरुपौर्णिमा- ११ जुलै १९७६) संध्याकाळी गेलो होतो. संध्याकाळी रोषणाई पाहून रमजगमत परत येत असताना एच एम टी च्या फॅक्टरीच्या गेटासमोर मला डाव्या हाताच्या हॅन्डलच्या मुठीशी एकदम धक्का लागला. स्कूटरचा तोल गेल्याने मी तेथेच कलंडलो. माझ्या मांडीवर स्कूटरचा भार आला. काय झाले म्हणेपर्यंत एक गुराखी ४-५ म्हशी रस्त्याकडेने नेत असल्याचे वाटले. त्यानेच माझ्या पायावरून स्कूटर उचलून मोकळे केले. धक्का लागला तेव्हा मागून 'शशी' अशी हाक आली होती. त्या अनुरोधाने छायास मी पहात होतो. तर ती रस्त्याच्या मध्यात उताणी पडलेली समोरून येणाऱ्या वाहनांच्या प्रकाशात दिसली. मी तिच्या पाशी पोचेपर्यंत तिकडून येणाऱ्या ॲम्बॅसेडर कारमधून लोक खाली उतरून आले होते. मी त्यांच्या सहाय्याने त्याच कारमध्ये तिला घेतले व चंदीगड मिलिटरी हॉस्पिटलकडे गाडी पिटाळण्यास सांगितले.

सुदैवाने ती कार हरियाणा गृहखात्याच्या वरिष्ठांची Stand by कार होती. वॉकी-टॉकीवरून होणाऱ्या संभाषणावरून मला ते कळले. छाया वाटेत कण्हत होती. भीतीने चक्कर आली असावी असा माझा अंदाज होता. माझी पॅन्ट फाटली, सॅन्डल तुटले पण पायाला खरचटण्यावर निभावले होते. हॉस्पिटलमध्ये एका मेजरने तिचा ताबा घेतला व मला मलमपट्टी करायला पाठवले. मी पट्टी बांधून परत येत होतो. मेजर ऑपरेशन रूममधून परत येत होता. त्याने माझ्या खांद्यावर हात ठेवला. 'सॉरी यंग मॅन. युवर वाईफ इज नो मोअर.' म्हणत ती दुःखद बातमी त्याने मला सांगितली. समोरून येणाऱ्या वाहनांच्या प्रखर प्रकाशात न दिसल्याने कडेने जाणाऱ्या म्हशीला स्कूटरला धक्का लागला. तोल जाऊन गडगडताना छायाच्या डोक्यास मार लागला. "कवटीस तडा गेला. व म्हणून मृत्यू" अशी तिच्या वैद्यकीय रिपोर्टमध्ये नोंद आहे.) वाचकांनीच संहितेची सत्या असत्यता ठरवावी.

### नक्षत्रांची मराठी व तमिळ नावे

| नक्षत्र क्रमांक | मराठी नाव | तमिळ नाव | नक्षत्र क्रमांक | मराठी नाव | तमिळ नाव |
|---|---|---|---|---|---|
| १ | अश्विनी | अश्विनी | १५ | स्वाती | स्वाती |
| २ | भरणी | भरणी | १६ | विशाखा | विशाहम |
| ३ | कृतिका | कार्तिहै | १७ | अनुराधा | अनुशम |
| ४ | रोहिणी | रोहिणी | १८ | ज्येष्ठा | केटै |
| ५ | मृग | मिरुगशी/तिरुवम | १९ | मूळ | मूलम् |
| ६ | आर्द्रा | तिरुरू तिरुई | २० | पूर्वाषाढा | पुराडम् |
| ७ | पुनर्वसु | पुनरपूसम् | २१ | उत्तराषाढा | उत्तराडम् |
| ८ | पुष्य | पूसम् | २२ | श्रवण | तिरुओणम् |
| ९ | आश्लेषा | आईल्यम् | २३ | धनिष्ठा | अविट्टम् |
| १० | मघा | महम | २४ | शततारका | सदयम् |
| ११ | पूर्वा | पूरम | २५ | पूर्वाभाद्रपदा | पुरटादी |
| १२ | उत्तरा | उत्तिरम | २६ | उत्तराभाद्रपदा | उत्तरट्टादी |
| १३ | हस्ता | हास्तम | २७ | रेवती | रेवती |
| १४ | चित्रा | चित्तै | - | - | - |

# भृगूसंहिता - नातलग व इतर

**मा** झे मेव्हणे अविनाश रानडे यांनी त्यांचे भविष्य बाबूभाईंकडे पाहिले होते. याचा उल्लेख आला आहे. त्यांच्यासंबंधी काय काय घडले- न घडले ते पाहू.

अविनाश रानड्यांनी प्रथम ११ ऑक्टोबर ७३ ला संहितेचे अवलोकन केले. आई वडिलांचे नाव बरोबर जन्मस्थान मुंबई, (माझी बहिण) लताबरोबर प्रेमप्रकरण- मातापिता विरोध, पण लग्नानंतर मावळेल- शनि-मंगळाची शांती केल्यास सर्व व्यवस्थित.

पुढे लताशी विवाह झाला नाही तर काही पर्याय दाखवले गेले की, सुंदर पण चारित्र्यवान नाही किंवा नोकरी करणारी अशा मुलीशी २९ व्या वर्षापर्यंत लग्नाचे योग. (लताशी १९७४ साली विवाह झाला). २८/ ३० व्या वर्षी सर्व्हिस मध्ये ब्रेक (एक दोन वर्षे आधीच त्यांनी बॅटरी सेल्सचा कारखाना काढण्यासाठी नोकरी सोडली होती. संहितेत धंद्याबद्दल उल्लेख नाही. नोकरीत (दुसऱ्या) प्रगती असा उल्लेख.

३४-३६ व्या वर्षी घर, वाहन यांचे सुख. (ठीक उल्लेख)

३७-३९ चांगला उत्कर्षाचा काळ. (बरोबर फॅक्टरीत भाग्योदय. भागीदारीतून मुक्ती. १९८७ च्या सुमारास स्वत:ची 'लिओ' नावाची बॅटरी सेल्सची फॅक्टरी काढली.)

यापुढे ६७ वर्षांपर्यंत विविध घटनांचे भविष्य वर्तवले आहे. (६ मे १९८९ रोजी मारुती कार मधून येत असताना एका दुधाच्या टँकरला धडक बसून अविनाश व त्याचा एक मित्र यांचे अपघाती निधन झाले.)

१९७३ नंतर कै. अविनाश रानड्यांनी १९८१ च्या सुमारास पुन्हा याच संहितेचे अवलोकन केले होते. यातही अपघाती मृत्यूचा काहीच उल्लेख नाही. भविष्यात ६७ च्या पुढे ७३ वर्षापर्यंत आयुष्यातील घटना वर्णन केल्या आहेत. वैशाख एकादशीला मृत्यू वर्तवला होता. ते सर्व घडण्याची वेळच आली नाही!

माझ्या वडिलांना स्व. जनार्दन चिंतामण ओक- बाबूभाईंबद्दल मित्रांकडून माहिती होती. त्यांनी स्वत:चे भविष्य पाहिले होते. इतपत मला माहिती होती. पण त्यांचे टिप्पण पाहून चर्चा करण्याचा योग कधी आलाच नाही. जानेवारी १९८१ साली ते वारले. त्यानंतर कागदपत्रांची विल्हेवाट लावत असताना त्यांचे टिप्पण हाती आले. आई, वडील, त्यांचे नाव जन्मगाव, जन्मदिवस याबाबत माहिती अचूक होती. पुढे घर व वाहन होईल. यापैकी घर झाले पण वाहन (कार) त्यांनी घेतली नाही. (सायकल हे वाहन मानले नाहीत तर) मधुमेहाचा त्रासही वर्तवला होता. ६४-६५ व्या वर्षी ऑपरेशन छोटेसे वर्तवले होते. ६६ व्या वर्षी हृदय विकाराचा व रक्तदाबाचा त्रास होईल असे म्हटले होते. ६७ व्या वर्षात विशेष करून पौष शुल्क अष्टमी या दिवशी हृदयविकाराने मृत्यू असे वर्तवले होते. त्यांच्या मृत्यू दिवसाची पंचांगातील नोंद पौष शुल्क षष्ठी, ११ जानेवारी १९८१ अशी होती. म्हणजेच एक वर्ष आधी पण तिथीत २ दिवसांचा फरक होता.

मुलाचे वायूसेनेत दाखल होणे (कापडाचा तुमचा धंदा मुलगा सांभाळेल) सुनेचा अपघाती मृत्यू. याबाबत काही उल्लेख नव्हता. माझ्या वडिलांनी माझ्या बहिणीचे (लता) भविष्य साधारण १९६६ साली पाहिले होते तेव्हा ती १३ वर्षांची होती.

कॉलेज शिक्षण पण डिग्री नाही (त्या काळाच्या संदर्भात बरोबर. नंतर तिने पदवी प्राप्त केली.)

१४ ते २२ व्या वर्षापर्यंत काळजीचे जातील. (तिच्या २१ व्या वर्षी अविनाशशी विवाह. त्या आधी दोन्ही घरातील वडीलधाऱ्यांचा विरोध. त्यामुळे सर्वांना मन:स्ताप झाला.)

२८ व्या वर्षी प्रथम पुत्र. नंतर २ कन्या. (पुत्र २२ व्या वर्षीच झाला. मुलगी मात्र एकच आहे.)

३३ व्या वर्षी विदेश यात्रा (बरोबर नाही.)

३६ व्या वर्षी मोटर कार वाहन सुख (३३ व्या वर्षापासूनच गाडी होती.)

५८ व्या वर्षापर्यंत पतीचा विविध ठिकाणी उल्लेख. अपघात त्याच्या जीवाला धोका आदी काही सूचक उल्लेख नाही. बॅटरी सेलचा कारखाना अविनाशच्या पश्चात तिचे दीर व ती व्यवस्थित सांभाळत आहेत. याबाबतही काही उल्लेख नाही.

वरील सर्व टिप्पणातून असे दिसते की, भविष्य काळातील घटना फारच त्रोटकपणे दिल्या जातात. बाबूभाईंकडील टिप्पण एका फुलस्केप पेपरवरच संपून जाते. भविष्यातील घटना नक्की त्याचवेळी होतील असा ठामपणाही कमी आहे. घटना न घडणे किंवा घटलेल्या घटनांचा उल्लेख न मिळणे ही बऱ्याच ठिकाणी आढळते.

महाराष्ट्र बँकेतून रिटायर झालेले श्री सुरेश श्रीपाद जोशी, सुकृत सोसायटी पुणे ९ यांनी बाबूभाईंच्या ज्योतिषाबद्दल

(पान ३८ पाह

# होशियारपूर भृगूसंहितेचा मासला

**श्री.** भोपे. महाराष्ट्र शासनाच्या लेबर कोर्टाचे न्यायाधीश म्हणून नुकतेच रिटायर झाले व सध्या मुंबईच्या हायकोर्टात ते प्रॅक्टिस करतात. श्री. भोपे 'मधुरंजन' या टोपण नावाने प्रथितयश कादंबरी व नाटककार आहेत. त्यांना २५ वर्षापूर्वी होशियारपूरच्या भृगूसंहितेचे अवलोकन करण्याचा योग आला.

त्याचे असे झाले की, ते व त्यांच्या मित्रांनी मोटारीने उत्तर भारताची ट्रीप काढली होती. दिल्लीत एकांनी त्यांना भाक्रानानगल धरणाच्या बाजूला गेलात की, होशियारपूरला भृगूसंहिता पहाण्यास जरूर जा असा सल्ला दिला. इतर मित्रांना त्यात रस न वाटल्याने ते एकटे होशियारपूरला अमृत आनंद भृगूशास्त्री, रेलमंडी यांच्या केंद्रात दाखल झाले. तेथे आपली कुंडलीबरोबर असावी लागते. तेथे बऱ्याच (हजारोंच्या संख्येने) कुंडल्या मांडून ठेवलेल्या असतात. त्यांच्याशी आपली कुंडली जमवायची. ती जमली की त्या कुंडलीच्या संदर्भात भृगूशास्त्री ज्योतिष टिप्पण हुडकून काढतात व तुम्हास सांगतात.

श्री. भोपे तेथे पोचले तेव्हा बरीच मंडळी आपआपली कुंडली हुडकण्यात दंग झालेली होती. काहींशी विचारणा करता गेले आठ दिवस कुंडली हुडकण्यात ते यशस्वी झालेले नव्हते असे कळल्यावर. श्री. भोप्यांचा उत्साह थंडावला. एका दिवसात कुंडली सापडवून नंतर ज्योतिष पहाणे त्यांना अशक्य वाटले. तरीही नेटाने अमृत भृगूंशी आपली इच्छा त्यांनी बोलून दाखवली. सुदैवाने अमृतजींच्या मदतीने त्यांची पत्रिका सापडली व भविष्य पहाता आले. त्यातील काही नोंदी त्यांच्या संमतीने सोबत देत आहे.

राजयोगाची पत्रिका. सध्याच्या जन्मातील नाव मधुकर वडीलांचे नाव राम (खरे रामचंद्र)

त्या आधीच्या जन्मातील नाव वसंत दत्तात्रय.त्यावेळी मुंबईत धनिक क्षत्रिय कुटुंबात जन्म. मुंबई इलाख्याचे उच्च अधिकारी. जातक या जन्मात 'पूना' या गावी श्रावण कृष्ण प्रतिपदा. शनिवारी जन्मला. (सर्व बरोबर) मित्रांबरोबर सहलीस आले असता ३७ व्या वर्षी ग्रंथाचे अवलोकन करण्यास मुद्दाम आला आहे.

एका भावाच्या पत्नीचे ७८ साली निधन. दुसऱ्या भावाला ७५-७६ सालात अपघात व कष्टाचे जीवन. खुद्द श्री. भोप्यांना शुक्र मंगळ युतीमुळे द्विभार्या योग (सर्व बरोबर).

एक मुलगा (होताच) आणखी एक अपत्य मुलगी असे भाकीत (नंतर ७२ साली ती झाली)

जातक न्यायाधीश म्हणून राजकारभारात वरिष्ठ पदावर.

४५ व्या वर्षानंतर भाग्यात वाढ लेखक म्हणून प्रसिद्धी (सर्व बरोबर). श्री. भोप्यांनी १३ ऑक्टोबर १९७३ साली बाबूभाईंच्या कडील भविष्य पाहिले होते. ते फार त्रोटक व बऱ्याच ठिकाणी बरोबर नाही असे त्यांचे मत पडले.

श्री. भोप्यांनी भविष्याच्या संदर्भात एक मजेशीर गोष्ट सांगितली ती त्यांच्या शब्दात अशी, मला, तरुणपणी वडिलांच्या आग्रहामुळे वकिलीचा व्यवसाय चांगला चालला असताना काळा झगा उतरवून न्यायाधीशाची पगारी नोकरी स्वीकारवी लागली. त्यामुळे मी वडिलांवर नाराज होतो. त्या काळच्या न्यायाधीशाच्या महिन्याच्या पगाराची रक्कम मी चुटकीसरसा मिळवत असता वडिलांनी फुकट पगारी नोकरीत लटकवले असा माझा ग्रह झाला होता. भृगूसंहितेतील भविष्य वाचल्यावर मला असे वाटले की, मी वडिलांवर उगीचच नाराज होतो. मी न्यायाधीशच होणार होतो. वडील ते बनण्यास निमित्त मात्र झाले. माझ्या वडिलांवर रुसण्यात काहीच अर्थ नव्हता. नंतर त्यांनी वडिलांना तसे कळवून आपले मन मोकळे केले.

श्री. भोप्यांच्या जन्मगावांच्या संदर्भात 'पूना' असा उल्लेख आला तेव्हा मी नक्की करण्यासाठी 'पुणे' की 'पूना' असा प्रश्न केला. तेव्हा त्यांनी 'पूना' पुणे नाही असे ठामपणे सांगितले. कारण याच संदर्भामुळे त्यांनी महाराष्ट्रात जेव्हा मुंबई का बॉम्बे हा वाद उसळला होता तेव्हा त्यांनी भृगू संहितेतील पूना-पुणे नाही. या उल्लेखास उद्धृत करून कोतेपणाच्या कल्पना सोडलेल्या बऱ्या असा लेख प्रसिद्ध केला होता.

श्री. भोप्यांची वडिलांवरची नाराजी जशी भृगूसंहितेने दूर केली. तसाच माझाही एका वेगळ्या तऱ्हेने असाच भ्रम दूर झाला.

त्याचे असे झाले की, मी तेव्हा श्रीनगरमध्ये पोस्टींगवर होतो. पत्नी सौ. अलका प्रथम बाळंतपणास माहेरी गेली होती. त्याच सुमारास संतोष ट्रॉफीच्या फुटबॉलच्या मॅचेस श्रीनगरमध्ये चालू होत्या. काही मॅचेस प्रत्यक्ष जाऊन तर काही मॅचेसचा आनंद रेडिओवर कॉमेंट्री ऐकून मी घेत असे. तेव्हा बंगालच्या टीममध्ये चिन्मय चॅटर्जी हा महत्वाचा

# नवग्रहांची मंदिरे

नाडी भविष्य पाहिल्यानंतर शांती-दीक्षा कांडात काही सोपस्कार करायला सुचवले जाते. ते अत्यंत काटेकोरपणे व उच्च भावदशेने केल्यास पुढे येणारी कष्टप्रद स्थिती टाळता येणे शक्य आहे असे नाडीकर्ते आश्वासन देतात. ज्यांचा या गोष्टींवर विश्वास आहे त्यांनी नवग्रहांपैकी काही व इतर मंदिरात भेटी देण्याचे ठरवल्यास, ती मंदिरे कुठे आहेत याचा नकाशा पाहून अंदाज येईल. शिवाय उपयुक्त माहिती खाली देत आहे.

| अ. क्र. | ग्रह मंदीर | गावाचे नाव | विशेष माहिती |
|---|---|---|---|
| १. | सूर्य | सूर्यनार (मंदीर) | कुम्भ कोणमजवळ आडुदुरै पासून 1 कि.मी. अंतरावर. |
| २. | चंद्र | तिंगलूर | तिरुवैय्यार गावाजवळ. |
| ३. | मंगळ | वैदीश्वरन (मंदिर) | मईलाडुदुरै ते सिरकंडी बस मार्गावर. |
| ४. | बुध | तिरुवेंकाडु | सिरकांडीहून 16 कि.मी. दूर पूम पुहार मार्गावर. |
| ५. | गुरु | आलंगुडी | कुंभकोणमपासून नीडमंगलम बसमार्गावर. |
| ६. | शुक्र | कंजनूर | आडूदुरैच्या जवळ. |
| ७. | शनि | तिरुनल्लार | कारैकलजवळ पेरुमालच्या बसमार्गावर. |
| ८. | राहू | तिरुनागेश्वरम (मंदिर) | कुंभ कोणमपासून ७ कि.मी. |
| ९. | केतू | पेरुमाल | तिरुवेंकाडूच्याजवळ. |

खेळाडू होता. प्रत्यक्ष पाहून व कॉमेंटीत सारखे नाव ऐकून 'चिन्मॉय' (बंगाली उच्चार) हे नाव मला आवडायला लागले. शिवाय श्री. चिन्मयानंदांच्या महतीचा परिणाम न कळत पडल्याने मुलगा झाला तर चिन्मय हे नाव ठेवावे असे ठरवले. पुढे पुत्रप्राप्तीची तार आल्यावर हे नाव मी पत्नीस सुचवले व तिलाही आवडून तेच नाव ठेवले गेले. तेव्हा पासून मुलाचे नाव 'मी' ठेवले आहे असा भाव उगीचच घर करून होता.

श्री. अगस्त्य नाडी केंद्रात चिरंजीवांचे भविष्य पाहताना जेव्हा त्याचे नाव चिन्मय. वडील- शशिकांत. माता-अलका. असा उल्लेख आला तेव्हा मात्र 'मी' ठरवून ठेवलेल्या नावाचा दंभ किती पोकळ होता याची जाणीव झाली.

ठरलेल्या घटनांना, भविष्याला होण्यास आपण निमित्त मात्र होतो. करत आपण काहीच नाही. आपणाकडून करवले जाते याची सणसणीत जाणीव या छोट्या छोट्या घटनेतून होते. ■

## जुन्या ज्योतिष केंद्रांची / (पान ११ वरून)

उपयोग झाला नाही. बाईंनी मला बाहेर काढले! मीही तावातावाने "आम्ही दक्षिणेतील लोकांना नेहमी पंजाबी लोकांच्या आदरातिथ्याचे दाखले देतो. मला थंड पाणी द्यायचे सोडून मला तुम्ही बाहेर काढता? बाहेर भविष्य सांगतो असा बोर्ड का लावलाय?" असे म्हणून वगैरे वादावादी झाली. मी नंतर अमृत भृगूशास्त्रींना झाला प्रकार सविस्तर पत्र पाठवून कळवला; पण भृगूशास्त्रींनी आतापर्यंत मौन साधलेले आहे, असो.

**५) पंडित हवेली राम :** आचार्य अरुण संहिता, जुना पत्ता : ३, दरियागंज, नवी दिल्ली.

पोस्टमास्टर दरियागंज यांना पाठविलेल्या पत्राचे उत्तर आले. पंडित हवेलीराम यांचे १२ ऑगस्ट १९८२ साली स्वर्गवासी झाले. त्यांचे चिरंजीव जुगल जोशी त्याच पत्यावर भविष्य सांगतात. नवा पत्ता : ३/४३१३, अन्सारी रोड, दरियागंज, दिल्ली २. Tele.: 3272286, 3269431.

**६) श्री. भृगू शास्त्री, १७५, प्रिन्सेस स्ट्रीट, ३रा मजला, मुंबई-२. पत्रोत्तर नाही. व्यक्ती व पत्ता बाद समजावा.**

**७) पं. शिवकुमारजी दीक्षित :** बुढाना गेट, मेरठ (भृगू संहिता). पत्रोत्तर नाही. तथापि व्यक्ती व पत्ता याचा शोध चालू.

**८) श्री. बाबूभाई शास्त्री :** पत्ता : Y.M.C.A. बिल्डिंगजवळ, २रा मजला, लॅमिंग्टन रोड, मुंबई ४.

श्री. बाबूभाई शास्त्री हयात नाहीत. त्यांचे चिरंजीव त्याच पत्यावर वडिलांची गादी चालवतात. दोन वर्षांपूर्वी मी त्यांची भेट घेतली होती. त्या वेळी त्यांची फी ४०० रु. होती. चिरंजीवांनी- (आता नाव आठवत नाही) माझ्याशी १०-१५ मिनिटे गप्पा मारल्या. बाबूभाईंच्या कडील सूर्य व भृगू संहितेचे अवलोकन करण्याचे भाग्य मला लाभले आहे. त्याची सविस्तर माहिती पुढे पाहावी. ■

# श्री अगस्त्य नाडी नवम कांड व मी

जनरल- प्रथम कांड पाहून बरेच दिवस गेले होते. मध्यंतरीच्या काळात बरीच कांडे, शांती दीक्षेचे सोपस्कार जवळजवळ संपत आले. मे महिन्याच्या सुटीत पत्नी व २ मुले पुण्या-मुंबईकडे गेली होतील. ऑफिसच्या अडचणीमुळे मला रजा नव्हती. घरी एकटाच होतो. वेळ होता. एकानी अध्यात्मिक पुस्तके दिली त्यात मन रमले टी.व्ही., पेपर, सिनेमासिकांत रस वाटेना का कोणास ठाऊक नवम कांड आपण वाचावे असे वाटायला लागले. कांडाची वही बनली पण राजेन्द्रनला रेकॉर्डिंगला वेळ नव्हता. एक दिवशी ३ तास ठिय्या मारून बसलो तो टेप घेऊन जाण्याच्याच इराद्याने त्या कांडातील काही भाग सोबत दिला आहे.

आत्तापर्यंत कुठल्याही कांडातील भविष्यकाळातील घटनांबद्दल प्रत्यय आला नव्हता. चार महिन्याच्या काळात अपेक्षा तरी कशी करायची? पण या कांडाच्या संदर्भात जे घडले ते विलक्षण म्हणावे लागेल. मी माझ्याबाबत लिहितोय म्हणून भावनाविवशता व थोडीशी प्रौढी याचा भाग न कळत आला असेल तर तो वगळता वाचकांना पुढील वर्णन नक्कीच मनोरंजक वाटेल.

नवम कांडमच्या वाचनानंतर लगेच पांडेचरीला जाण्याचा योग आला. त्या वेळच्या प्रवासाचे वर्णन 'एक अद्भूत दिवस' असे करावेसे वाटले. तेही वाचकांसमोर ठेवत आहे.

## नवम कांडम

ओम नमो नारायणाय श्री अगस्त्य मुनी नवव्या कांडाचे भविष्य कथन करतात तेव्हा ते ओंकार प्रणव ध्वनीस लवून नमस्कार करतात अर्धनारी नटेश्वरास व ईश्वरीदेवीस नमून एका पुण्यवान पुत्राचे (पुनित मईदन) भाग्यस्थानातील भविष्य कथनास प्रारंभ करतात.

धनुसू- लग्नम् कन्या- रासिमध्ये जन्मलेला जातक गुणी, नशीबवंत बुद्धीमान आहे. उच्च चारित्र्यवान या जातकाचे नाव- शशिकांत पित्याचे-जनार्दन, मातेचे- मंगला प्रथम पत्नी-छाया व सध्याच्या पत्नीचे नाव- अलका आहे. वयाच्या ४५ व्या वर्षी हे भविष्य पाहिले जात आहे.

याच काळात तुमच्या मनात अत्यंत शुभ, अध्यात्मिक विचारांचे प्रभुत्व असेल. हाच काळ असा आहे की त्यात पुढील अध्यात्मिक प्रगतीसाठी सूक्ष्म व सखोल विचार करून पुढील मार्ग ठरवला जाणार आहे. तुमची नोकरी सरकारी असून संरक्षण खात्याची आहे. वडिलांचे आधीच निधन झालेले आहे. तरीही तुमच्या वडिलांचे सूक्ष्मरित्या दर्शन तुम्हास घडत असते. तेच तुमचे अध्यात्मिक मार्गातील पहिले गुरू होत. त्यांच्या कृपा (प्रसादाने) आशीर्वादाने आणि त्यानंतर इतर काही संत महात्म्यांनी अनायासपणे केलेल्या कृपा प्रसादामुळे तुमची ध्यान मार्गात बरीच प्रगती होणार आहे. त्या गुरूंनी तुमच्यावर अनपेक्षितपणे केलेल्या कृपा आशीर्वादाच्या लहरी समुद्राच्या लाटाप्रमाणे तुमच्यावर वेळोवेळी बरसत असतात. ते सर्व गुरू सध्या यात नाहीत.

या पुढील आयुष्यात संसारिक जीवन सुखी व भरभराटीचे जाईल. व अध्यात्मिक प्रगतीही घडत राहील. वयाच्या ४६ ते ४८ वर्षात तुम्ही प्रसिद्ध व नावाचा गवगवा होऊन मानाने जगाल.

आत्तापर्यंतच्या आयुष्यात ज्या गुरूंनी उपदेश व कृपा आशीर्वाद दिले त्यांच्या प्रभावामुळे भावी आयुष्यात अनुकूल प्रभाव पडून अध्यात्मिक प्रगतीस गती येणार आहे. सध्याच्या अनुकूल विचार धारणेतून ज्ञानबोध मिळण्याची संधी जवळ येत आहे. त्याचे फळ म्हणजे लवकरच एका गुरूची भेट होणार आहे. त्यांच्या उपदेशाने/ आशीर्वादाने अध्यात्मिक जीवनात योग्य ते बदल घडून येतील. ते गुरू 'तिरूवन्नमलाई' येथे राहात असून एका अमावस्येच्या दिवशी त्यांची भेट होईल. त्यावेळी बरेच भक्तगण त्यांच्या दर्शनाला उपस्थित असतील. त्यानंतर ते गुरूकृपा आशिर्वाद किंवा उपदेश देतील त्यावेळी आणखी कोणीतरी बरोबर असेल. (बऱ्याच मोठ्या तामिळ वाक्यानंतर) त्यांचे नाव ज्याने लंकापती रावणाचा नाश केला त्या राम + कुमार असे नाव पुढे असलेली व्यक्ती असलेली असेल. ते ज्ञान देऊन उपकृत करतील. (एक रामसूरत कुमार नामक व्यक्ती तिरूवेण्णामलाईस आहेत. ताडाचा पंखा हातात घेऊन वारा घेणारे 'वीसरी सामी'' किंवा ''फॅनबाबा'', ''विंझणबाबा'' असेही त्यांचे वर्णन करतात- इति नाडी वाचक राजेन्द्रन)

पुढील प्रगतीसाठी अरविंदाश्रम पाँडीचेरी येथे एका पौर्णिमेस जाणे होईल. तेथील ध्यान- धारणेच्या स्थानावर जाऊन ध्यानास बसावे. दोन भुवयांच्या व नाकाच्या टोकावर नजर स्थिर करून, प्राणा यामाच्या अनुरोधाने ध्यानस्थ स्थितीत ''मौन नी लै'' आत्म पटलावर विविध गोष्टींचे सूक्ष्म ज्ञान घडेल. तो तुमच्या आयुष्यातील अत्युच्च अनुभवाचा काळ असेल. त्यात एक

(पान ३७ पाहा)

# एक अद्भूत दिवस

## बौद्ध पौर्णिमा दि. २४ मे १९९४

प्रत्येकाच्या जीवनात असे काही क्षण असतात की त्याचे वर्णन करणे सहज जमत नाही. तरीही भविष्यकाळात मार्गदर्शन म्हणून, वैचारिक मरगळ, नैराश्य यामधून अध्यात्मिक प्रगती व्हावी यासाठी प्रेरक शक्ती म्हणून हे क्षण टिपण्याचा प्रयत्न.

बौद्ध पौर्णिमा हा बुद्धाच्या ज्ञान प्राप्ती व निर्वाणाचा दिवस. तो दिवस २ दिवसांनी असताना अरविंद आश्रमात ध्याना/ चिंतनासाठी इतर कुठल्यातरी पौर्णिमेला का तिष्ठत बसावे ? शिवाय 'रामसूरत कुमार'' ऊर्फ विंझणबाबा खरोखर अस्तित्वात आहेत का ? याची खात्री २/३ जणांनी दिल्यावर मग आता थांबतोस कोणासाठी ? कशासाठी ? असे म्हणत दि. २४ मे ला संध्याकाळी ६॥ ला मी पाँडेचेरीच्या बसमध्ये होतो. बसमध्ये एका मारवाडी तरूणाशी ध्यान-गुरू याबाबत गप्पा झाल्या व १० वाजता बस पाँडचेरीला पोचली. लगेच रिक्षा करून आश्रमाकडे कूच केले. रात्रीच्या वेळी आश्रमात सामसूम होते. रात्री ११ ला आश्रम- अरविंद व मा यांची समाधी भूमि व ध्यान कक्ष बंद होणार म्हटल्यावर मी घाईने ध्यान स्थानाकडे निघालो. अरविंद व मा यांच्या मोठ्या तसबिरीकडे पाठ करावी की तोंड असा पेच वाटला. कारण त्याच्या विरुद्ध दिशेला एक सॅटिनच्या कपड्याने झाकलेला बेड होता. व पांढरे पडदे होते. मांडी घालून ताठ बसलो. ''ध्यानाला बैसणे'' हे पाहून व वाचून माहित होते. काही वेळ श्वास बाहेर आत घेणे यावर मन केंद्रित केले व नाकाच्या टोकावर दृष्टी आणण्याचा प्रयत्न केला. २/३ वेळात टोकाच्याकडे दृष्टी आणत असताना कपाळ जड झाले. भुवयांची हालचाल मंद वाटली व ओढ लागल्यासारखे वाटले. डोळे मिटण्याइतपत झाकले गेले. असे ५/६ मिनिटे वाटत होते की काहीतरी होतय. तेवढ्यात पाठीमागे कोणी आल्याची हालचाल झाली. मी त्याच्याशी बोललो की ११ वाजेपर्यंतच मला थांबता येईल हे मला माहित आहे. पुन्हा ते गेल्यावर दृष्टी पुन्हा नासिकाग्राकडे केंद्रित केली. थोड्याच वेळात एका बिंदूत दृष्टीची ओढ लागली तेथेच काही आहे काही आहे असे वाटू लागले करता करता तो बिंदू काळपट, निळसर, जांभळ्या रंगाच्या छटेत वेढला आहे असे वाटू लागले. मध्येच थोडेसे भान आल्याप्रमाणे होई तेव्हा समोरच्या पिवळ्या प्रकाशातील गादी, पडदे यांच्या पांढरेपणाचा आभास जाणवतोय व निळसर रंग दिसतोय जाणवतोय अशी खात्री करण्यासाठी मी चाळवाचाळव केली. नंतर त्या निळसर रंगांचे ढग आहेत की काय अशी धारणा झाली व त्या शोधक बिंदूपाशी पांढरट गोल आंहे असे भासले कधी तो पांढरट गोल ठळक होतोय तर कधी पुसट होऊन निळसर- जांभळट रंगाच्या ढगाआड लपतोय असे वाटत राहातय. वाटतय की लपाछपीच्या खेळातला डाव रंगलाय. दिसतोय ही पण लपतोय ही ! काय आहे ? कोण आहे ? असे बरेच क्षण गेले असावेत. पुन्हा पायांच्या येण्याचा आवाज जवळजवळ आला. व मी भानावर आलो ११ ला १/२ मिनिटे असावीत साधारण १२/१५ मिनिटांच्या काळात वरील घडलेले अनुभवायला मिळाले. समाधान नव्हते. नाइलाज होता. तेथून बाहेर आलो पुढील २५/३० मिनिटात एका हॉटेलात रूम मिळवून पुन्हा बेडवर बसून ध्यानाच्या पोझमध्ये बसून होतो. साधारण १२ ला १५ मिनिटे असताना. ती दादांची (वडील) आठवण आली. हसरा चेहरा तर कधी ध्यानाच्या मुद्रेतील शांत व धीर गंभीर चेहरा डोळ्यासमोर उभा राहिला. एक एक संत महात्म्यांचे रूप तरळले. प्रज्ञानानंद माझ्या पाठीवरून हात फिरवत आहेत. महाद्बा महाराज भस्माचा टिळा अंगठ्याने कपाळावर लावता आहेत. मा आनंदमयीची मी पालखी उचलतो आहे. गुरूचरित्रकाराने वर्णलेले नृसिंह सरस्वतींचा फोटो, उपळेकरांचा फोटो यांचे दर्शन घेतल्याचे झाले. खरे तर याशिवाय मला आता आठवत नव्हते असेही कोणी होते. अंधुक पुसट पुन्हा घड्याळात पाहता १२ ला १० कमी मग मी इतर विचारांना मागे सारून ५/७ वेळा श्वासाच्या हालचालीवर लक्ष देऊन नासिकाग्रावर मन केंद्रीत केल्यावर तोच जांभळा ढगांचा रंग प्रकाश पुन्हा अवतरला. त्याच्या अवतरण्याने एकदम विश्वास वाटला की मगाशी आपल्याला खरेच जांभळा/ निळा रंग दिसत होता तो भास नव्हता. भास नाही, नक्कीच नाही असे सारखे मनात येत होते. व आता पांढुरका टिपकाही पुन्हा तरळला, लपला एक दोनदा असे होई. तेव्हा एकदम बुद्धाचे चित्र, पुतळा दिसला. स्मितहास्य शांत नयन यांचा आभास वाटला. पुन्हा भास वाटला बुद्धच की कोण, भानावर आलो तेव्हा १२ वाजून २ मिनिटे झाली होती. पाठ भरून आली असे वाटले. हात जोडून बसलो आईच्या पायांना स्पर्श केल्याचा भास झाला. नंतर हळूवारपणे देह निद्रिस्त झाला. ■

# ''तेरा काम हो जाएगा''

## दि. २५ मे १९९४

पाँडीचेरीच्या आश्रमात पुन्हा पहाटे आगमन. वाटेत कमळाची फुले अगरबत्ती घेतली ती समाधीवर वाहिली. व पुन्हा ७.१० ला ध्यानास बसलो. बरेच लोक बसलेले होते. वातावरण प्रसन्न होते. पुढील २० मिनिटे ध्यानास बसलो. कालचाच अनुभव रंगाचा पण पांढुरका टिपका होता की नाही आठवत नाही. ७॥ ला उठावेसे वाटले. पुढील ३०/४० मिनिटांत आश्रमाचा सर्व परिसर पाहिला न्याहाळला. समाधीपाशी बरेच लोक डोके टेकून बसले होते. तेथे तसे बसण्याचा प्रयत्न केला पण पोटाला व पावलांना त्रास जाणवला. २/३ पुस्तके घेतली व 'तिरुवन्न मलाई'च्यासाठी बसमध्ये बसलो. अरविंदांचे जीवन पुस्तक वाचता वाचता बस बदलण्याची वेळ आली. व तिरुवन्नमलाईच्या बसमध्ये आरुढ झालो. गरमी, चिकचिक जाणवत होती. १२॥ च्या सुमाराला गाडी स्टॅन्डला आली. पोलिसाच्या मदतीने रिक्षा केली. व रिक्षावाल्याने 'योगी रामसूरत कुमार आश्रम' येथे आणून सोडले. योगी आता ४ ते ६ दर्शन देण्यास येणार होते. तेथेच प्रसाद म्हणून सांबार भाताचे जेवण अन्नछत्रातून मिळते ते घेतले व स्वामींची वाट पहात थांबलो होतो. हळूहळू ४ पर्यंत ५०/६० जण जमले होते. ४ नंतर स्वामीजींचे आगमन झाले. आम्ही पुरुष व स्त्रिया वेगळ्या बाजूला स्वामीसमोर बसलो. मधे २ फूटाची जागा सोडली होती. बराच वेळ भजन व संकीर्तन झाल्यावर योगी उठले व पुरुष व स्त्रियांच्यामध्ये ठेवलेल्या चिंचोळ्या पट्टीतून फेऱ्या मारायला लागले. प्रत्येक भाविकाच्याकडे पहात ते पुढे जात. पुन्हा बायकांच्याकडे पहात पहात जागेकडे परतत, पुन्हा पुरुषांकडे दृष्टी टाकत पुढे जात. चाल भरभर असे पाहिले न पाहिले इतपतच नजरानजर होत होती. मी त्यांच्या पुढेच बसलो होतो. पुन्हा स्थानापन्न होऊन त्यांच्यावर रचलेल्या भजनांत ते रमत होते. पुन्हा मधेच उठून फेऱ्या मारण्याचा सपाटा. बोलणे कोणाशीच नाही. पुन्हा बसते झाल्यावर त्यांच्या शिष्यांने सांगितले 'स्वामीजी पाऊस येतोय पहा तिकडे डोंगरावर!' ''वा छान पाऊस येतोय,'' असे आपल्याशी म्हणून रंगले. असे ४ वेळा उठून फेऱ्यामारण्याचे झाल्यावर मी पुढल्या वेळेला त्यांच्याकडे पाहण्यापेक्षा पायावर नजर केंद्रीत केली. त्यांची पावले पुढे गेली व परतत असताना ते 'तेरा काम हो जाएगा' असे म्हणताना मी ऐकले. मानवर केली तर ते पुरुषांच्या बाजूला पाहून उद्देशून म्हणत आहेत असे वाटले ते परत बसले जागेवर जाऊन. मी विचार करत होतो की कोण असेल? कोणाला उद्देशून म्हणाले ते? 'काम' कोणीच बोलून दाखवलेले नव्हते. कोणाच्याच डोळ्यात पाहून ते म्हणाले असेही नव्हते. सर्व भाविक तमिळभाषी असताना पुरुषांच्याकडे पाहून 'हिंदीत' हे जरा वेगळे वाटले. त्याच वेळी बाहेर भक्तगणांची गर्दी वाढल्याने एव्हाना हॉलमध्ये १५० पर्यंत लोक असावेत. आमच्यासारख्या आधी येऊन योगींच्या जवळ शेजारी जागा बळकावणाऱ्यांना हुसकून बाहेर काढण्यास प्रारंभ झाला मीही जागेवरूनच वाकून नमस्कार करून कोणी 'बाहेर व्हा' म्हणण्याच्या आत उठून चालू लागलो. बाहेर ट्रस्टींशी ३/४ प्रश्न विचारून रिक्षा करून स्टँडवर आलो. तेव्हा संमिश्र प्रतिक्रिया होती. योगींचे रुप, त्यांच्या सभोवतालचे वातावरण व भेटीच्या काळातली त्यांची वर्तवणूक यामुळे मन खट्टू होते. बसमध्ये बराच वेळ त्याच मनस्थितीत गेला मग जोरात पाऊस येऊन वातावरण शांत, थंड झाले. शांत झालेल्या मनस्थितीत असताना 'तेरा काम हो जाएगा' या वाक्यावर मन रमले. प्रत्येकच तेथे 'कामा' निमित्त आला होता. आता प्रत्येकाचेच 'काम' होणार की काय? असाही प्रश्न वाटला पुढे वाटले की सगळ्यांची कामे होणार. तर माझे 'काम' काय होते? मी तर खरा गुरुच्या शोधात आलो होतो. अगस्त्यमुनींनी सांगितले आहे तर ते नक्कीच असणार असा विश्वास होता. मग माझे काम जर गुरुचेदर्शन घेणे होते. तर त्यानंतर पुढील मार्गदर्शन हे त्यांचे काम होते. त्यासंदर्भात ते म्हणाले. ''तेरा काम हो जाएगा!'' निदान माझ्यासाठी!

आधीचे खट्टू मन पालटले. पावसाळी वातावरण केव्हाच संपले होते. रात्रीचे ८ नंतरची वेळ बसच्या खिडकीतून पौर्णिमेच्या चंद्राचे दर्शन होत होते. त्याच्याकडे पहात पहात कालच्या पांढुरक्या ठिपक्याची आठवण झाली. असेच चंद्र ढगाआड जातो तेव्हा निष्प्रभ होतो पुन्हा तरळतो हेच चित्र होते. तेव्हाच कांडममधील 'बिम्बम' या शब्दाचा संदर्भ लागला. ज्योती नव्हे शांत तरळणारा प्रकाश जणू काही पाण्यातील चंद्राचे प्रतिबिंब! काय माझी दोन्ही उद्दिष्टे सफल झाली? याचे उत्तर भविष्यकाळांतील प्रगतीच देईल. इतर इतर कोण देणार?

■

# पुन्हा एकदा योगी रामसूरतकुमार

२५ मे ९४ ला दिलेल्या भेटीनंतर पुन्हा योगी रामसूरत कुमारांच्या आश्रमास भेट द्यावी, असे वाटायला लागले. मी पत्नीस पाँडिचेरीला जाऊ. तेथे तू काही खरेदी कर. मग आश्रमांत जाऊ. रात्री हॉटेलात मुक्काम करू. दुसऱ्या दिवशी तिरुवन्नमलाईस योगींच्या दर्शनाला जाऊ व संध्याकाळपर्यंत परत येऊ. असा बेत मांडला. मुलांचे अभ्यास, उकाडा, बराच खर्च वगैरे कारणांची ढाल दाखवून पत्नीने मोडता घालायचा प्रयत्न केला पण तुला आलेच पाहिजे असा प्रेमळ आग्रह केल्यावर तिला बेत मान्य झाला.

पाँडेचरीची ट्रीप करून तिरुन्नमलाईला योगींच्या आश्रमांत सकाळी ९॥ ला दाखल झालो. वाटेत मिठाई व फळे नेली होती. योगी आश्रमापासून दूर राहतात. टॅक्सीने त्यांचे आगमन झाले. त्यांच्यासमवेत ४-५ भजन गायिका स्त्रीशिष्या उतरल्या. योगी एका भिंतीला टेकून मांडी घालून आसनावर बसले. योगी भाविकांशी बोलत नाहीत ना कोणास जवळ बोलवत नाहीत. मधील जागेच्या पट्टीत फिरून लोकांना आशीर्वाद दिल्याचे हातवारे करतात व जागेवर पुन्हा जाऊन बसतात. त्यावेळी भजन-गायिकांचे सदैव कडाक्याचे भजन चालू असते. योगींच्या पाया पडणे, आपले दुःख त्यांना सांगणे, सांत्वना मिळवणे या गोष्टींना मनाई आहे. या पार्श्वभूमीवर योगींशी भेट, बोलाचाल स्पर्श अशक्यच होता. मग एकदम वाटले की आपण एक चिठ्ठी योगींच्या पाशी द्यावी. मग जे काय होईल ते होईल! एका पाकिटात "मी शशिकांत ओक श्री. अगस्त्य नाडीतील भविष्यांत आपण माझे गुरु आहात म्हणून आपला उल्लेख आहे त्या संदर्भात मी आपणांसमोर उपस्थित झालो आहे. आता पुढील काय ते आपण ठरवावे! व कृपा आशीर्वाद द्यावा." असे हिंदीतून लिहून त्यालाच पेन लटकवून सज्ज होतो. भाविकांना आत सोडताच मी त्वरेने योगींच्या आसनाच्या पाशी गेलो. फार जवळ चाललोय हे पाहून योगींच्या शिष्यांनी ओरडा केला. "मागे व्हा मागे व्हा,' मी तसाच योगींच्या पुढ्यात जाऊन वाकून नमस्कार केला व ते पाकीट त्यांच्यासमोर ठेवले. तेवढ्यात आश्रमाचे ट्रस्टी श्री. सुब्रम्हण्यम यांनी ते पाकीट उचलून घेतले व मला आपण योगींच्या इथवर आलात का ? कसे ? एअरफोर्सची हीच का डिसिप्लीन ? असे अपशब्दांनी ताडन केले. नंतर मी पट्टीच्या वाटेतच बसलो. पत्नीचा चेहरा पडला होता. मला ते पाकीट योगींच्यापर्यंत देण्याशिवाय

## जन्म कुंडलीतील राशिस्थाने व कांडम

| स्थान कांड क्रमांक | स्थान | कांडात सांगितली जाणारी माहिती |
|---|---|---|
| १ | तनु-लग्न | जन्मवेळची ग्रहस्थिती, स्वतःचे, आई-वडिल, पति-पत्नीची नावे, लग्न, नोकरी, धंदा, भाऊ-बहिणी, मुलांचे असे १२ स्थानांचे त्रोटक जीवन भविष्य आदि. |
| २ | धन | पैसा अडका, कुटुंबाचे शिक्षण वाणी व इतर कौटुंबिक घटना, स्थावर इस्टेट आदि. |
| ३ | सहज/पराक्रम | भाऊ-बहिणींशी परस्पर संबंध, साहस, धीर यांच्या कृत्यांचे वर्णन आदि. |
| ४ | मातृ | आई, घर, वाहन, जमीन व विलासाच्या साधनांबद्दल सुख आदि. |
| ५ | अपत्य | मुले होणे/ न होणे, त्यांचे जन्म-मृत्यू, शिक्षण, त्यांचे भविष्य, दत्तक घेणे अकल्पित लाभ, विद्या आदि. |
| ६ | रिपु/रोग | आरोग्यासंबंधी तक्रारी, नोकरी धंद्यात त्रास, गुप्त शत्रू यावर इलाज आदि. |
| ७ | पति/पत्नी | लग्न केव्हा, कोणाशी, वैवाहिक जीवनाचे भविष्य उघड शत्रू, हेवे दाव्यांचे वर्णन आदि. |
| ८ | मृत्यू | जीवनात त्रास, अपघात, मृत्यूचे वर्ण, आयुष्याचा शेवटचा दिवस व त्यावेळची ग्रहस्थिती आदि. |

गत्यंतर नव्हते. ट्रस्टींनी ते पाकीट वाचून हिंदीत लिहिलेले पाहून योगींपुढे ठेवले. योगी ही हा सर्व प्रकार पहातच होते. त्यांनी पत्रातील मजकूर ध्यान देऊन वाचला असे दिसत होते. भजनाच्या फैरी झडत होत्या. माझे मन शांत झाले.

पट्टीतून फिरायला योगी उठले. त्यांच्या ३-४ फेऱ्या होईपर्यंत मी त्यांच्या हालचाली पहात होतो. नंतर खाली मान घालून बसलो होतो. इतक्यात माझ्यापाशी पावले थबकली. योगी खाली बसत माझा हात हातात घेत माझ्याकडे न्याहाळत माझी बोटे कुरवाळत विचारत होते, ''आर यू फ्रॉम विच स्टेट ?'' माझे शरीर कंपित झाले होते. डोळ्यातून अश्रूपात होत होता. रोमांच उठले होते. त्यातच थरथरत्या आवाजात मी म्हटले 'महाराष्ट्र'. योगींनी हातात हात बराच वेळ ठेवला होता. मग तो सोडवून आपल्या आसनावर बसते झाले. नंतर मला बोलावून जवळच नजरेच्या समोरच्या जागी बसवले. मला दुपारी ४ ते ६ दर्शनाला थांब असे सुचवताना 'धिस बेगर वॉन्टस् यु टू स्टे फॉर इव्हीनिंग दर्शन' असा आदेश दिला. स्वतःचा उल्लेख ते 'घाणेरडा भिकारी' असा करतात.

पुन्हा पेन देताना व नंतर एका अमेरिकन कवीने त्यांच्यावर केलेल्या कवितांचा संग्रहाच्या पुस्तकाची एक प्रत देताना 'शशिकांत ॐ' असा प्रसादात्मक आशिष दिला. तो देताना त्यांची भावदशा वेगळी होती. तोंडातून ते काही पुटपुटत होते. नजर माझ्या नजरेत खिळली होती. इतर भक्तगण वारंवार मला बोलावून स्पर्श करून आशीर्वाद देत आहेत हा प्रकार पाहून चकित झाले होते!

दुपारचा सांभार भाताचा भंडारा खाल्ला. दुपारच्या दर्शनाच्यावेळीही त्यांच्या नजरेचा आशीर्वाद घेऊन निघालो. ट्रस्टींना जातेवेळी, ''आज मला अत्यंत आनंद झाला आहे'' असे म्हणताच त्यांनी हातात हात घेत म्हटले 'होणारच' ''योगींची कृपा आपणावर झाली आहे. वरचेवर येत चला'' बसने १६० कि.मी. दूर परत घरी येता येता रात्रीचे १२ वाजून गेले होते. तरीही पत्नीला ९ व्या कांडातील योगींच्या बद्दलचा उल्लेख वाचायला दिला. त्यात म्हटले होते एका अमावस्येला योगींच्या दर्शनाला जाणे होईल बरोबर एक जण असेल. योगींच्या दर्शनाला भाविक जमले असतील त्यावेळी योगी कृपा आशीर्वाद देऊन उपकृत करतील!

कालनिर्णयचे कॅलेंडर भिंतीवरून काढून रविवार ७ ऑगस्ट १९९४ ची तिथी पत्नीस दाखवली. ती होती अमावस्या!

■

## अगस्त्य नाडी – नवम कांड व मी

(पान ३३ वरून)

ज्योत (तमिळ शब्द ''बिम्बम्'') दिसेल..

त्यानंतर पुढील भविष्य फार चांगले आहे... आयुष्याच्या शेवटी शेवटी (?) एक दिवशी आत्म ज्योतीच्या स्वरूपात सूर्यास्त व चंद्रादयाच्या संमिश्र काळात शिवदर्शन घडेल.

अशा तऱ्हेने श्री अगस्त्य मुनी या नवम कांडाची सांगता करतात.

॥ शुभम् ॥
दि. २० मे ९४

■

| | | |
|---|---|---|
| ९ | पितृ | वडिल, त्यांची संपत्ती, मंदिरांना भेटी, यात्रा. संत/गुरुंची भेट, पुण्यदान कर्मे आदि. |
| १० | कर्म | नोकरी, धंदा, भावी बदल्या, बढत्या, धंद्यातील प्रतिष्ठा, चढ/उतार, नोकरीतील त्रास व बदल आदि. |
| ११ | लाभ | लाभ, मित्र-मैत्रिणी, आकांक्षा, कला क्षेत्रातील पराक्रम, नाव, पैसा आदि. |
| १२ | व्यय | खर्च, परदेशागमन, अध्यात्मिक उन्नती, पुढील जन्माचे आकलन, मोक्ष आदि. |
| १३ | शांती- परिहारम् कांडम | पूर्व जन्माचे आकलन, पाप- पुण्याची झाडणी, व सूचवले गेलेले उपाय मंदिरांना भेटी अन्नदान आदि |
| १४ | दीक्षई कांडम् | शत्रूपासून त्रास चुकवण्यासाठी, जप, तप, गंडा आदि. |
| १५ | औषध कांडम् | रोग व दीर्घ आजार यावर आयुर्वेदिक उपाय योजना व घेण्याचा विधि आदि. |
| १६ | दिशाभुक्ती कांडम् | सध्याच्या चालू काळातील घटनांची जास्त विस्तृत माहिती. |
| १७ | ज्ञान कांडम् | अध्यात्मिक प्रगती व गुरु प्राप्ति, ब्रह्मज्ञान आदि. |
| १८ | प्रश्न कांडम् | आपणांस पडलेल्या विवक्षित प्रश्नांची उकल व उपाय योजना आदि. |

आपणास हव्या त्या नाडीकेंद्राशी पोस्टाने किंवा फोन वरून संपर्क साधून भविष्य पहायला जाण्यासाठी अपॉईंटमेंटची तारीख नक्की करावी.

# मद्रासमधील राहण्याची व वाहनाची सोय

आत्तापर्यंतच्या माहितीवरून वाचकांना कल्पना आली आहे, की भविष्य पाहायला. त्यातील रोमांचकता अनुभवायला स्वतः जाणे अति आवश्यक आहे. त्यासाठी सोपा उपाय पोस्टकार्ड पाठवून अंगठा छाप (स्त्रियांसाठी डावा व पुरुषांसाठी उजवा) देण्याची तारीख नक्की करून घ्यावी व जाण्याचे त्याप्रमाणे ठरवावे. लीव्ह ट्रॅव्हल कन्सेशन मिळणाऱ्यांनी आपल्या नातलगांना भेट देऊन सतावण्यापेक्षा नाडी केंद्राला भेट व शांती दीक्षेच्या निमित्ताने यात्रा अशी दोन्ही उद्दिष्टे साध्य होऊ शकतात ! हवे तर आणखी दोघांचे अंगठे बरोबर न्यावे. नाडी शास्त्रींनी त्यांचे भविष्य सांगितले, तर येणारा खर्च वाटून घ्यावा.

दीक्षा व शांती साठी प्रवासाला मद्रासच्या पासून बसेस सोईच्या. कमी खर्चाच्या, स्वच्छ, जलद व वरचेवर असे बसेसचे वर्णन करता येईल. स्टेट-ट्रान्स्पोर्ट शिवाय इतरही बसेसचे प्रचंड जाळे आहे. नकाशाच्या आधाराने सोईचा मार्ग व वेळ ठरवावी.

मंदिरात अंघोळ करून ८ पर्यंत पोहचावे. बाहेरील दुकानातून तबकातील पूजा साहित्य मंदिरातील पुजाऱ्याला देताना लग्न, राशी, गोत्र, नाव आदी तत्परतेने सांगावे लागते. नारळ व इतर पूजा साहित्य कुंकू व मिठाईच्या प्रसादासह परत करतात. काही मंदिरात १२ ते ४ विश्रांती असते. वेळे बाहेर गेले तर दिवस मोडतो. तेव्हा खाण्या/ पिण्याच्या मागे लागून फाजिल वेळ न काढलेला बरा.

महाराष्ट्र मंडळ, इगमोर मद्रास स्टेशनजवळ, वेपेरी भागात आणि इतरत्र हॉटेल/ धर्मशाळा याची सर्व ठिकाणी सोय होते. साधारण ३० रु. बेडच्या हिशोबाने हॉटेलात रूम मिळते. जेवणात मात्र भात मुबलक !

शांती दीक्षा करण्याने/ केल्या वर समाधान, गुण वाटला तर आपल्या खिशाला परवडेल किंवा भावनेने वाटेल इतपत. एखादी भेट वस्तू नाडी केंद्रास द्यावी अशी माझ्यातर्फे सूचना.

रेल्वेने पुण्याकडून दौंड- सोलापूर करत रेणीगुंठ्यावरून(तिरुपतीस थांबत) मद्रासला ३ ट्रेन्स आहेत. पैकी २ रात्री पोचतात; तेव्हा पुढच्या दिवशी उठून सकाळी ८/९ पर्यंत नाडी केंद्रात प्रथम नंबर लागतो.

वर्धा, नागपूर कडूनही ३ ट्रेन्स जलद आहेत.

मद्रासमध्ये सिटी बसेस नंबर वर चालतात. 18 J. 51 J. 21 J. वगैरे नंबर तांबरमला येणाऱ्यास सोईच्या. टी नगर (मांबलम) दादरप्रमाणे मध्यवर्ती आहे. लोकल ट्रेनने आल्यास तांबरम शेवटचे स्टेशन पडते. रमणीशास्त्रींच्या आश्रमास जायचे, तर तांबरमच्या इस्टला उतरावे. ६ कि. मी. रिक्षाने भारती इंजि. कॉ. समोर जावे. अगस्त्य नाडी निलायमला जायचे, तर तांबरम वेस्टला उतरून फिलिप्स हॉस्पिटलमागे जावे. ■

## मराठी कुंडली मांडण्याची पद्धत

२ धन
१२ व्यय
३ पराक्रम
१ तनु (लग्न)
११ लाभ
४ मातृ
१० कर्म
५ अपत्य
७ जाया
९ पितृ
६ रिपु
८ मृत्यू

## तमिळ कुंडली मांडण्याची पद्धत

| | | | |
|---|---|---|---|
| १२ व्यय परमार्थ | १ स्व तनु | २ धन कुटुंब | ३ सहज पराक्रम |
| ११ लाभ मित्रमैत्रिणी | तमिळ कुंडली | | ४ मातृ सुख |
| १० कर्म नोकरीधंदा | | | ५ अपत्य, विद्या |
| ९ पितृ गुरु | ९ मृत्यू | ७ जया भागीदार | ६ रिपु रोग |

## भृगू संहिता– / (पान ३० वरून)

सांगितलेला किस्सा मजेशीर आहे.

१९७१ साली ते आपल्या श्री. हसबनीस व श्री. प्रधान नावाच्या मित्रांना घेऊन बाबूभाईंना भेटायला गेले. बाबूभाईंच्या भविष्य कथनाची पद्धती त्यांना माहित होती. तेव्हा त्यांची परीक्षा घ्यावी म्हणून श्री. जोशीना आत बोलावल्यावर श्री. हसबनीस आत गेले. पण थोड्याच वेळात बाहेर आले. पण श्री. प्रधानांना जोशी म्हणून आत खोली पाठवून जोशी बाहेर हॉलमध्ये बसून होते. काही वेळातच बाबूभाई स्वत: जोशांना बोलवायला बाहेर आले. बाबूभाईंना नेमक्या व्यक्तीचा संदर्भ कसा लागला असावा हा विचार करण्याचा भाग आहे.

श्री. जोशी यांचा या भविष्यबाबतचा अनुभव मात्र फार चांगला नाही. २४ व्यात लग्न. (२३ व्या वर्षीच झाले.) अधू नेत्र (बरोबर). ३ अपत्याऐवजी ४ झाली. याबाबत श्री. जोशींनी बाबूभाईंना पुन्हा भेटून छेडले. व त्यांनी थातूरमातूर बोलून यांना परतवून लावले. ■

# अभिनव 'नाडी भविष्य' कोडे



''नाडी भविष्य'' पुस्तकावर आधारित या कोड्यात उत्तराचे शब्द आपणास योग्य त्या अक्षराच्या संख्येनुसार भरावयाचे आहेत. सोडवलेल्या कोड्यासोबत

१. मला हे पुस्तक का आवडले कारण ——————

२. नाडी भविष्य पहावला जायचे ठरवले. कारण ——————

३. दीक्षा शांती करावी/ करू नये कारण ——————

४. या पुस्तकात आणखी काय माहितीची अपेक्षा आपण करता ——————

### उत्तराचे शब्द

| | | |
|---|---|---|
| ॐ | गुलाम | तिंगल |
| तै | विभृतु | कोकणी |
| मत | नारद | साधारण |
| रम | कुम्बम | ताम्बरम |
| धानु | आष्टमी | रमणीशास्त्री |
| गटै | नंदन | कुम्भकोणम |
| ष्टद | अगस्त्य | आनंदभृगु |
| तुला | महिना | मैलाडीदुरै |
| रवि | मीनम | अरविंदाश्रम |
| नीरै | कुसूर | रामसूरतकुमार |
| राहू | आवनी | |
| आडी | गदिमा | |
| रटै | वावदु | |

या प्रश्नांची उत्तरे खालील पत्त्यावर पाठवावीत.


**NEHA PUBLICATIONS**

नेहा पब्लिकेशन्स

**ALKA OAK**

अलका ओक

Air Force Station Tambaram

MADRAS 600 046

# समारोप

'भविष्य हा विषयच मोठा रंजक. पण गहन आहे. त्यात शिरावे तितके थोडेच.

हजारो वर्षापूर्वी अत्यंत कष्टमय परिस्थितीतून आणि एका विशिष्ट भाव दशेतून तयार केले गेलेले ताडपत्रावरील ज्ञान-साहित्य कुठे कुठे उपलब्ध आहे हे सांगून आपल्या पूर्वज ऋषीं-मुनींनी केलेल्या महान कार्याचे आपल्या स्वतःच्या भविष्यापुरते ओझरते दर्शन घेण्यास काय हरकत आहे? यासाठी मनोधारणा तयार करावी, हा या पुस्तकाचा उद्देश होता.

जास्तीत जास्त काय होईल ? भविष्य पाहून काही वर्षे उलटल्यावर त्यात वर्तवलेल्या घटना घडल्या तर त्यांची चर्चा नक्कीच आपल्या मित्रात, आप्तात कराल. काही गोष्टी घडल्या नाहीत तर आपल्याबाबत ऋषींचा अंदाज चुकला किंवा माझ्यापर्यंत येता येता त्यात विविध त्रुटी आल्या असे म्हणून सोडावे लागेल. पण दोन्ही परिस्थितीत ऋषींनी आपल्याबद्दल एक ताडपत्र लिहिण्याचे जे कष्ट घेतले ते माझ्यापर्यंत पोचले याचे समाधान तर आपणास मिळेल!

'नाडी भविष्य' यावर अजून बरेच लिहिता येणे शक्य आहे. भारतीय संस्कृतीचा अत्यंत महत्त्वाचा ठेवा हे चमत्कारजन्य नाडी ग्रंथ साहित्य होत. २०० वर्षापूर्वी छत्रपती शिवाजी महाराजांचे वंशज तंजावरचे महाराज सरफोजी राजे भोसले यांनी लाखो ताडपत्र्यांचे पुनर्लेखन करण्यास प्राधान्य देऊन हा सांस्कृतिक वारसा जनत केला आणि मानवतेवर महान उपकार केले.

हे भविष्य ऐतिहासिक काळात जसे लिहिले गेले तसे आजच्या मानवाला यापुढे जन्माला येणाऱ्या मानवाचे भविष्य लिहिता येणे का शक्य नाही ? विज्ञानाच्या कसोटीवर सत्य व असत्य पारखून लोकांच्या मनातील भोळेपणा कमी करण्यासाठी अनेक संस्था कार्यरत आहेत. त्यांना याबाबत विचार करता येण्यासारखा आहे.

अंगठ्याच्या ठशावरून जर व्यक्तीच्या नावाचा छडा लागतो, तर त्याचा फायदा विविध गुन्हे करून जाताना मागे ठेवलेल्या अंगठ्याच्या ठशावरून काही अज्ञात गुन्हेगारास पकडून शिक्षा करता येणे शक्य नाही काय ? त्यातून नाडी भविष्याच्या पुराव्याची न्यायालयीन मान्यताही देखील स्पष्ट होणे शक्य आहे.

मद्रास किंवा त्यापेक्षा दूर जाण्याऐवजी मुंबई-पुण्यात नाडी केंद्र काढून या भागातील लाखो लोकांची सोय कशी करता येईल या बाबतही विचार होणे आवश्यक आहे. वाचकांपैकी कोणी उदारपणे जागेचा व मराठी, गुजराथी, हिंदी व इंग्रजी भाषांतराचा प्रश्न सोडवण्यास पुढे आले तर काही नाडी शास्त्रींना केंद्र उघडण्यास तयार करता येणे शक्य आहे.

या पुस्तकातील विचार फक्त अशा नाडी ग्रंथाबाबत आहेत की ज्यात जातकाचे, त्याच्या आईवडिलांचे, बायकोचे नाव व जन्माची तिथी, वार, महिना व वर्ष कोरले गेले आहे व अंगठ्याच्या ठशावरून किंवा कुंडलीवरून सांगितले गेले आहे. 'असली' म्हणून भूर्जपत्रावरून किंवा पुस्तकाद्वारा प्रकाशित ग्रंथावरून सांगितलेले भविष्य प्रस्तुत लेखकास अभिप्रेत नाही. याचा अर्थ ती रचना 'नकली' आहे. असा लेखकाचा दावा नाही. याची वाचकांनी नोंद घ्यावी.

तंजाऊरच्या सरस्वती महाल, वैदीश्वरन कोईल येथील नाडी केंद्रांना भेटी, रमणीशास्त्री व इतर तज्ञ यांच्याकडून नाडीचा इतिहास, व्याप्ति, देशाचे भवितव्य आगामी जागतिक मानवी नरसंहार यावर प्रकाश पाडून घ्यायचा आहे. याशिवाय हे पुस्तक वाचून किंवा आधी ज्यांनी नाडी ग्रंथांचे अवलोकन केले आहे त्यांनी आपले अनुभव-विचार पाठवले तर त्यांच्या फोटोसह पुढील सुधारित आवृत्तीत समाविष्ट करता येतील.

## वाचकांना नम्र विनंती

हे पुस्तक वाचून बरेच वाचक या लेखकाकडे पत्ररूपाने किंवा भेटून अंगठ्यांचे ठसे व पैसे देऊन नाडी केंद्रात लग्गा लावण्यासाठी गळ घालण्याची शक्यता आहे. लेखक त्यांच्या भावना जाणतो. परंतु, नोकरीतील व्यस्तता व जागेच्या अभावामुळे योग्य ते आदरातिथ्य करू शकणार नाही. सुरक्षा कारणांमुळे एयर फोर्सच्या गेटच्या आत येण्यास परवानगी न मिळाल्यास रागावून, चिडून निराश होऊ नये. आपल्या भविष्याची रोमांचकता आपणांसच अनुभवायला नको काय ?



# ना डी भ वि ष्य

नाडी ग्रंथ शास्त्र हा भारतीय संस्कृतीचा व साहित्याचा ठेवा आहे. अनेक महर्षींनी हजारो वर्षांपूर्वी, लाखो-करोडो लोकांसाठी, तमिळ व इतर भाषांमध्ये लिहिलेल्या नाडी भविष्य ग्रंथांची ओळख विंग कमांडर शशिकांत ओक यांनी ''नाडी भविष्य'' या पुस्तकात केली आहे.

भविष्य हा विषयच मोठा रंजक. प्रत्येकाला 'पुढे काय होणार' हे जाणण्याची प्रचंड उत्सुकता. नुसत्या अंगठ्याच्या ठशावरून आई-वडिलांचे, पती-पत्नीचे, स्वत: तुमचे नाव, जन्म-तिथी, वार, महिना, संवत्सर प्राचीन ताडपत्रावर कोरलेले तुम्ही तुमच्या डोळ्यांनी पाहू शकलात व पुढील भविष्य जाणू शकलात, तर चमत्कार नव्हे काय ?

''नाडी भविष्य'' पुस्तकात विंग कमांडर शशिकांत ओक यांनी जिज्ञासू वृत्तीने नाडी ग्रंथांचे अवलोकन करून आपल्याला व इतरांना आलेले अनुभव सादर केलेले आहेत. या शिवाय नाडी-भविष्याबाबत उत्सुकता असणाऱ्यांसाठी नाडी-शास्त्रींचे पत्ते व इतर आवश्यक माहिती पुस्तकात एकत्रित करून ज्योतिषशास्त्रातील अनुभवी तज्ज्ञांना आणि वैज्ञानिक दृष्टीच्या विचारवंतांना काही अनुत्तरित प्रश्नांची उत्तरे देण्यास जरूर उद्युक्त करणारा आहे.

आपल्याकरीता लिहून ठेवलेले भविष्य वाचण्याची प्रेरणा आपणांस मिळावी यासाठी 'नाडी-भविष्य' पुस्तक प्रकाशित होण्याची नाडी ग्रंथ रचनाकारांची योजना असावी !

विंग कमांडर शशिकांत ओक यांची 'अपछायिता' (झपाटलेली) कादंबरी प्रसिद्ध झालेली आहे. शिवाय पुढारी, सह्याद्री वाचकांत सिनेजगत व सामान्यज्ञानावरील कोड्यामुळे ते परिचित आहेत. हिंदीतील 'राष्ट्रीय सहारा' या वर्तमानपत्रातील कोड्यामुळे व 'पुस्तकमहल' यांच्यातर्फे प्रकाशित ५ कोड्यांच्या पुस्तकामुळे ते हिंदी भाषिकांतही सुपरिचित आहेत.


नेहा पब्लिकेशन्स

पुणे 411 030